# मानलेलीं मुलें



लेखक

मा. भ. नंदुरकर



किंमत १॥ रु.

प्रकाशक—
दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर
५२९, सदाशिव पुणें



मुखपृष्ठावरील चित्र श्री. दलाल यांचें आहे.

१९३९ प्रथमावृत्ति
१९४४ द्वितीयावृत्ति



मुद्रक—
अनंत कृष्ण कुलकर्णी
आनन्द प्रिं. प्रेस,
१८२, सोमवार पेठ सातारा.

# कथाक्रम



# आमचें प्रकाशन

| | | | रुपये |
|---|---|---|---|
| १ | तीन मुलें | साने गुरुजी | २॥ |
| २ | क्रांति | " | ३ |
| ३ | स्त्रीजीवन १ व २ | " | २॥ |
| ४ | मुलांसाठीं फुलें | " | । |
| ५ | राष्ट्रधर्म | " | २ |
| ६ | समाजधर्म | " | १॥ |
| ७ | समाधीवरलीं फुलें | वि. स खाडेकर | २ |
| ८ | अत्तराचे दिवे | वि. वि. बोकील | १॥ |
| ९ | मंगळागौरीच्या रात्रीं | " | २॥ |
| १० | मीना-नीना | " | १. |
| ११ | आशा | " | २॥ |
| १२ | कडू साखर | ग. ल. ठोकळ | १॥ |
| १३ | काव्यकलेचे अंतरग | के नारखेडे | २ |
| १४ | आगरकर | पु. पा. गोखले | ॥। |
| १५ | माईची माया | ना घो. ताह्मणकर | १ |
| १६ | जागत्या छाया | अनत काणेकर | २ |

# प्रवासांतील चकमक : : १

ह्या बायका म्हणजे अशाच ! सव्वासहा वाजून गेले तरी अजून तयारी होत नाहीं. मेलला तर अवघा अर्धा तास राहिला. दुपारपासून मी गडबड करतों आहें तरी आईची बांधाबांधी कांहीं संपत नाहीं. जरासें चिडूनच मी घड्याळ आईपुढें केलें. " पाहिलेंस किती वाजलेत ते ! आटप लौकर. कितीही गडबड केली तरी तुम्हां बायकांचा आपला उशीर तो उशीर. "

" अरे बाबा, झालंच ना सारं. एवढी तिची ओटी भरल्यें म्हणजे झालं. हं ताईबाई, झटकन् पाटावर बस पाहूं. "

" म्हणजे अजून राहिलंच वाटतं हें ? दाराशीं टांगा आणल्यावर आठवण झाली वाटतं. मघापासून ओरडून ओरडून जीव काढून ठेवलाय् टांगेवाल्यानं. तुमचीं कांहीं कृत्यं आटपायचीं होतीं तर टांगा आणायची गडबड तरी कशाला केली ? होऊं द्या सावकाश. तुमचं सर्व संपलं म्हणजे जाऊं उद्यां—परवां. " माझ्या शब्दांतील उपहासाची धार आईच्या हृदयाला चाटून गेली. तिचें तोंड गोरेंमोरें झालें. ताईही बरीच चपापली. आईकडे पहात तिनें म्हटलें, " असं रे काय भाऊ बोलतोस ? आमचं झालंच ना सारं ! टांग्यांत सारं सामान ठेवीपर्यंत येतेंच मी. भारीच धांवपळ करायची. " वातावरण किंचित् प्रसन्न करण्यासाठीं ती हळूच म्हणाली, " माझा शाम एवढा लहान असून देखील अशी गडबड करीत नाहीं की. "

" तर तर " असें म्हणतच मी टांग्यांत सामान घालूं लागलों.

आमच्या ताईसाहेबांची आज सासरीं रवानगी करायची होती. पहिल्या बाळंतपणानंतर आपल्या छकुल्याला घेऊन ती मुंबईला चालली होती. तिच्या पतिराजांना मुळींच सवड नसल्यामुळें तिला व तिच्या ‘ लाजा ’ला मुंबईपर्यंत सुखरूप नेऊन पोहोंचविण्याच्या कामावर आईनें माझी नेमणूक केली होती. हजार लटपटी करून मीही १० दिवसांची रजा मिळविली होती व त्या दहा दिवसांत ताईच्या पतिराजाचा पाहुणचार स्वीकारून ताईच्या बाळंतपणासाठीं केलेल्या डिंकाच्या लाडूचा, शिऱ्याचा नि साजुक तुपाचा जो अवाढव्य खर्च झाला होता त्याची थोडी तरी भरपाई करून घ्यावी अशा अंतस्थ हेतूनें मीही निघालों होतों व त्यामुळें माझ्या आंतल्या मनांत आनंदाचे पाझर फुटले होते.

ओटींत घातलेले तांदूळ व नारळ हातरुमालांत गुंडाळून ताईनें देवाला नमस्कार केला. आईला करायला ती वांकतांच तिच्या पाठीवर आपला हात ठेवून आईनें कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला. पण हृदय अत्यंत भरून आल्यामुळें तिच्या तोंडून शब्दच फुटला नाहीं. ‘ सुखी हो ’ असेंच कांहींसें पुटपुटत ती अनिमिष नेत्रांनीं तिच्याकडे पाहूं लागली. बघतां बघतां तिचे डोळे भरून आले. ते टिपण्याचें देखील तिला भान राहिलें नाहीं. “आई, येत्यें हं मी” हे ताईचे शब्द कानावर पडतांच ती भानावर आली. हंसण्याचा निष्फळ प्रयत्न करीत म्हणाली, “ ये बरं, नीट जपून जा. मुलाला सांभाळ, पाण्यांत फारसें काम करूं नकोस. वावडं तिखट मिठाचं फारसं खाऊं नकोस, बाधेल तें बाळाला. वामन,, नीट सांभाळून ने बरं हिला. गाडींत खिडकीशीं बसूं नकोस, वारं लागेल बाळाला.

या आतां. पोंचल्याबरोबर पत्र मात्र पाठविण्याचें विसरूं नंकोस बरं; या या आतां. ताई, तूं बैस आधीं टांग्यांत मग वामन देईल बाळाला."

आईच्या मनांत होत असलेली कालवाकालव पाहून माझ्याही मनांतलें खिन्नतेचें आभाळ भरून आलें. जड अंतःकरणानें मी टांग्यांत चढलों. आमचा टांगा दूर गेला तरी आई दरवाजाच्या पायरीवर उभी राहून भुकेल्या नजरेनें आमच्याकडे पाहात होती. मी ताईकडे पाहिलें, तिच्याही डोळ्यांतून मृगाच्या सरी कोसळत होत्या.

काल—मग एक वर्ष नाहीं तर एक क्षण असो, मनुष्याच्या दुःखावर विस्मरणाचें औषध लावणारा अश्विनीकुमार आहे. क्षणापूर्वी मृगाची संतत धार लावलेल्या ताईच्या मुखावर आतां स्टेशनपाशीं येतांच पुनवेचें चांदणें फुललें होतें. आणि तिचा बाळ चंद्रासारखा प्रकाशत होता. स्टेशन येईपर्यंत मात्र आजूबाजूच्या इमारतींकडे, थिएटराकडे व गिरण्यांच्या चिमण्याकडे ती आसुसलेल्या नजरेनं पहात होती. पुनः येईपर्यंत आतां ही कोठली दृष्टीस पडायला असा खेदकारक विचार तिच्या मनात डोकावत होता. क्षणमात्र आपण जाऊंच नये असें तिला वाटलें असावें. पण स्टेशनांत आल्याबरोबर तिला आपल्या घरची ओढ लागली. सिनेमांतला एक सारांश संपून दुसरा सुरूं होतांच पहिल्याची थोडी देखील स्मृति राहात नाहीं. तद्वतच स्टेशन पाहिल्याबरोबर तिला मुंबई समोर दिसूं लागली. आईला ती अजिबात विसरली. तिच्या डोळ्यापुढें एकच दृष्य दिसूं लागलें. मुंबई, आपलें सदाशिव गल्लींतील घर, आपले पतिराज आणि याच गोड कल्पनेनें गहिंवरून गेल्यामुळें तिचें मुख अधिकच दीप्तिमान् दिसूं लागलें.

टांग्यांतून उतरतांना तिचा पदर टांग्याला अडकला व किंचित्

फाटला. त्यावर मी लगेच हंसून म्हटलें, “ सोलापूर सोडवत नाही अगदीं नाहीं ? बाकी इथं आहे काय म्हणा एवढं आकर्षक ! एक फुटका दरिद्री किल्ला, सकाळच्या प्रहरीं फडक्यांत भाकरी बांधून धावपळ करणारे मजूर नि एक मूर्ख वेडा भाऊ! इथं का सदाशिव गल्ली आहे का ‘ ते ’ आहेत ! ”

“ इश्श ! ही का थट्टा करावयाची वेळ आहे ? तुझी आपली ऊठ—सूट थट्टा! पहिल्या प्रथमच असा थोडासा कां होईना पण अपशकून झालेला पाहून माझ्या बाई मनांत चर्र करतं. काय होणार आहे देव जाणे. ”

ताई म्हणजे आईचा अवतार अगदीं! जरा कुठं कांहीं मनावेगळं झालं कीं, आल्याच लाखों शंका. जरा सुद्धां विवेक नाहीं कीं धैर्य नाहीं.

“ हो, काय होणार आहे सांगू कां ? आजची मेल थेट मुंबईला न जातां रामेश्वरला जाणार आहे. रोजच्या रोज मुंबईला जाऊन तिला कंटाळा आला आहे, म्हणून जरा पाय मोकळे करावयाचे तिच्या मनांत आहे. ”

“ शर्थ झाली बाई ! असं कांहींच्या बाही बोलून भिवऊं नकोस मला. चल आधीं. ” किंचित् भयविव्हल झालेल्या दृष्टीनें ताईनें मजकडे पाहिलें. तार ज्यास्त ओढण्यांत हंशील नाहीं असें पाहून मी मुकाट्यानें सामान हमालाच्या डोक्यावर चढविलें. तिकिटें काढून आम्ही त्रिवर्ग प्लॅटफॉर्मवर दाखल झालों.

समोर टीस्टॉल पहातांच माझ्या चहाबाज तोंडाला पाणी सुटलें.

"इश्श, आतां इतक्यांत भरगच्च जेवून निघालों ना आपण ? आणि एवढ्यावर चहा ! आई म्हणत्ये तें कांहीं खोटें नाहीं. भाताला एक वेळ वरण नसलें तर चहाबरोबर देखील भाऊ भात खाईल. इश्श चहाची एवढी तलफ बरी नाहीं हो भाऊसाहेब."

"आणि सिगारेटची मात्र फारच छान नाहीं का ? शामच्या बापाच्या तोंडांत तर अहोरात्र अग्निहोत्र पेटलेलं असतं ना ! त्यांच्या तोंडाला तर अश्शी घाण येते. त्यांचा घरांतला वास तर थेट बोरीबंदरपर्यंत येतो. छे छे छे, माझं डोकं असं फिरून जातं—"

"हात जोडतें बाई तुला. तूं चहा पी, कॉफी पी नाहीं तर हिम्टो पी, तुझ्याशीं बोलायचं म्हणजे माणसानं अगदीं तोलून मापूनच बोलायला पाहिजे." खरोखरच ताईनें हात जोडले.

आतां कशी ! माझं व्यसन काढतेस नाहीं का ? नाक दाबल्याशिवाय तोंड उघडत नाहीं नि वर्म काढल्याशिवाय बंद होत नाहीं. अच्छा जाने दो. माझ्याकरितां तरी तूं घेतलाच पाहिजे. निदान या तुझ्या 'टोणग्यासाठीं' तरी. संध्याकाळचा गारठा सुटायला लागलाय्. तेवढंच पोट गरम होईल."

"बरं बाई आतां काय तुझ्या ताब्यांत आहें मी. चहाच काय पण बॉयलरांतील कढत पाणी जरी आणलंस तरी तें घेण्याची माझी तयारी आहे."

"ओहोहो ! काय पण आज्ञाधारकपणा हा !"

गाडी यायला दोनच मिनिटें अवकाश होता. जून महिना अर्धा झाल्यामुळें ठिकठिकाणीं शाळाकॉलेजें नुकतींच सुरू झालीं होतीं. तसे सुटींत पांगले गेलेले विद्यार्थी आपापल्या शाळेच्या गांवीं निघाले

होते. विशेषतः विद्यार्थ्यांचा भरणा आज फार होता. क्वचित् दूर काशीच्या प्रवासाला निघालेल्या कांहीं वृद्ध बायका, लग्नाला चाल-लेलं एक मारवाडी वऱ्हाडही या जमावांत दिसत होतं. या सर्व जमावाकडे ताईचा शाम आपल्या ' इवल्या डोळीं ' चकिततेनं पहात होता आणि ताई त्याच्याकडे कौतुकल्या नजरेनं पहात होती.

" गाडी आल्याबरोबर तूं नुसती शामला घेऊन उभी रहा. सामान उचलण्याच्या भानगडींत पडूं नकोस. हमाल आणि मी जागा शोधतों आणि मग ये तूं, नाहीं तर करशील आपली नेहमींसारखी पळापळी. मागच्यासारखी धावाधाव करायला आतां कांहीं तूं एकटी नाहींस. "

हंसत ताई म्हणाली, " बरं आहे आजोबा. आपल्या आज्ञेबाहेर नाहीं मी. "

यापुढें ती कांहीं बोलणार तोंच धाड् धाड् करीत गाडीनें स्टेश-नांत येऊन निश्वास टाकला. त्याबरोबर माझी नि मीं गुंतविलेल्या हमालाची एकच धांदल उडाली. ज्या ज्या डब्यापाशीं जावें तो तो अगदीं चिकार भरलेला दिसावा. एखाद्या विस्फटलेल्या कंपोजसारखा प्रत्येक डबा दिसत होता. जशी जागा सांपडेल तसे लोक बसले उभे राहिले होते. क्षणभर मला गोंधळल्यासारखें झालें. समोरच एक लहानसा डबा पाहून तेथेंच शिरण्याचा निश्चय करून हमालाला म्हटलें,

" इथंच बसूं आपण, चल शीर आंत. "

आमची डब्यांत शिरण्याची धांदल पाहून आंतल्या कांहीं मंड-ळींनीं ' यहां जागा नही ' च्या फैरी झाडल्या; पण एकोणिसाव्या चिनी पलटणीपेक्षांही जास्त जिवाची धडाडी दाखवीत मी आंत शिरलों,

दूर उभ्या असलेल्या ताईला ओरडून बोलावून घेऊन तिला हात देत तसेंच आंत ओढून घेतलें व हमालाकडून दरवाजापाशींच सामान रचून ठेवलें. डागांची संख्या मोजून हमालाचे पैसे चुकते केले.

नवीन घर भाड्यानें घेतलें म्हणजे जुन्या घरांतील सर्व सामान जिथें जागा सांपडेल तिथें पहिल्यांदा टाकतों व मग ज्या निवांतपणें जागच्याजागीं वस्तू नेऊन लावतों, त्या निवांतपणानें मी एकदां डब्यांत चौफेर नजर टाकली. बारा माणसांचा तो छोटा डबा होता. तरी आठ एक माणसें जवळ जवळ निम्म्या डब्यांतच दाटीवाटीनें बसलीं होतीं. दुसऱ्या बाजूला बाकाच्या कोपऱ्यावर शरीर टेकवलें आहे नाहीं अशा अवस्थेंत दोन कुरवाडी माणसं बसलीं होतीं, आणि बाकीच्या त्या सातअष्टमांश बाकावर आपला बिछाना ऐसपैस पसरून एक तरूण मुलगी कांहीं तरी वाचीत पडली होती. तिच्या वाचण्याच्या एकंदर ढबीवरून तिला जगाची दादच नसावीसें वाटलें. स्टेशनवर व आंतील बाजूस चाललेल्या खळबळीची तिला गंधवार्ता देखील नव्हती. जणूं काय महाबळेश्वर किंवा माथेरानच्या एखाद्या निस्तब्ध पॉइंटवर आपण बसलों असून भर्रर वहाणाऱ्या वाऱ्याशिवाय आपणाला कोणीच त्रास देणारा नाहीं असें तिला वाटत असावें.

त्या तरूण मुलीच्या अशा आढ्यतेवरून पहिल्यांदाच माझा ग्रह प्रतिकूल झाला. इतकीं माणसं गैरसोयीनं बसलीं आहेत आणि ही खुशाल पाय पसरून वाचत बसते! सहानुभूति, अनुकंपा, दया कांहींच का हिच्या हृदयांत उपजत नसेल?

आपण एकदां विनंति करून जागा मागावी. निदान ताईपुरती जरी जागा दिली तरी हरकत नाहीं. अशा हेतनें मी दरवाजांतनच

म्हटलें, " अहो अहो "– चालणाऱ्या गाडीच्या धडधडाटांत मा.. ते शब्द कुठल्या कुठें विरून गेले. मीं पुनः हाताची ओंजळ तोंडावर उभी धरून मोठ्यानें म्हटलें, " अहो–अहो बाई. "

तोंडावरचें पुस्तक किंचित् बाजूला सारून ' बाई ' नीं ' बुवा ' कडे पाहिलें. व पुनः पहिल्यासारखें जणूं कांहीं उटकमंडवर आहों असें कल्पून वाचन चालूं केलें. त्या मुलीची ही कृति पाहून मी तर चकितच झालों. साधा शिष्टाचार देखील हिला नसावा ?

" भाऊ, घेतोस का ह्याला ? सारखं घेऊन कळ आली हाताला. " शामला माझ्या स्वाधीन करीत ताई म्हणाली.

शामला घेतांना मला वाटतें त्या मुलीनें चोरून माझेकडे पाहिलें. कारण, मी पुनः तिच्याकडे पाहतों आहें तों सर्कन् तिनें पुस्तकांत तोंड लपविलें.

" अन् असं उभं राहून कुठंवर चालणार ? माझे तर पाय अगदीं दुखून आले. मी विचारितें वाटल्यास त्यांना. " त्या मुलीकडे तोंड करून तिनें विचारिलें—

" अहो, जरासा पाय काढाना बाजूला. थोडीशी बसूं द्या मला. आतांच कांहीं रात्र झाली नाहीं एवढी झोप यायला. "

हातांतलें पुस्तक धाडकन् बाजूला टाकून ती रागानें म्हणाली, " इथं जागा नव्हती तर दुसऱ्या डब्यांत कां गेलां नाहींत ? मी कां माझी गैरसोय करून घेऊं ? नसेल जागा तर उभ्या रहा. वाटल्यास इंटरचं तिकिट काढून आरामांत बसा. "

" तें तुम्ही नको आहे सांगायला. इंटरचं काढावं कां फोर्थ क्लासचं काढावं असा जेव्हां आम्हांला पेंच पडेल तेव्हां आपला

खास सल्ला विचारायला येऊं, तोंपर्यंत तिसऱ्या क्लासाबद्दलच विचा करूं." आलेला राग शक्य तेवढ्या कष्टानें दाबीत मी म्हटलें.

"मग मी साफच सांगत्यें, आपल्याला आपल्या कार्यात मुळींच यश येणार नाहीं." नाकपुडी लालबुंद करीत ती म्हणाली. तिनें पाय थोडेसे आंखडून धरले होते तेहि अधिकच लांब केले.

हा प्रकार पाहून ताईची मुद्रा बरीच संत्रस्त झाली. माझ्याहि मनाला एक तऱ्हेची बोंच लागली. दिसायला चांगली सुशिक्षि दिसते, सुंदर नि अशी वर्तणूक? इतकी बेपर्वाई?

पुनः एकदां समेटाचा प्रयत्न करण्याकरितां मघाचें सारें विसरून मी अजीजीनें म्हणालों, "आपण चांगल्या सुशिक्षित दिसतां सुसंस्कृत दिसतां आणि आपल्या तोंडून असे उद्गार निघावेत एकमेकांना साह्य करून–पैशाचं नाहीं म्हणत मी, पण सोयी गैरसोय समजून–निदान ह्या वेळेला तरी–जागा देण्याचं साह्य करून आपल्य मनाचा उदारपणा दाखवाल तर आम्हांला कृतज्ञता वाटेल."

"आणि माझ्याबद्दल तिरस्कार वाटला तरी मला थोडीच पव आहे? आपली कृतज्ञता व कृतघ्नता मी 'ट्रायफल' समजतें. पुन मी बजावून ठेवत्यें माझी गैरसोय करून मी मुळींच जागा देणा नाहीं. थेट मुंबईला जायचंय मला. वाटल्यास बोरीबंदरवर जाग करून देईन. तोंपर्यंत कळ सोसा. अन् बोरीबंदर कांहीं लांब नाहीं सकाळींच येईल तें."

तिचें तें कुत्सित बोलणें ऐकून माझ्या अंगाची लाही झाली विशेषतः डब्यांतील लोकांनीं तिच्या उत्तराला हास्याच्या पार्श्वभूमीच दिलेली साथ ऐकन तर माझ्या अंगाची काहीली झाली. सरळ मार्गा

ही जागा देत नाहीं, तर अडदांडपणा केल्याशिवाय आतां चालणार नाहीं, मग काय होणार असेल तें होवो, अशा हेतूनें मी दरवाजा-पासून पुढें सरकलेला पाहून त्या मुलीला काय वाटलें कोणास ठाऊक. ती पटकन् उभी राहिली व वर असलेला डबा खालीं काढून ती पुनः बाकावर बसली. डब्यांतील फराळाच्या एकेक जिनसा काढून ती बाकावर आजूबाजूला ठेवूं लागली.

तिची ही जागा अडविण्याची युक्ति माझ्या ध्यानांत आली. मीं लागलीच म्हटलें, " मीहि ब्राह्मणच आहें. आपल्या अन्नाला शिवून बाजूला ठेवून देण्यांत माझेकडून विटाळाचा दोष घडला तर त्याबद्दल आपल्याला फारशी तक्रार करतां येणार नाहीं. मीही आपल्याला पूर्ण बजावून ठेवतों कीं, रेल्वेच्या कोणत्याही अधिकाऱ्याची मदत न घेतां जागा करून घेईनच घेईन. मुकाट्यानें मला जागा देतां कीं नाहीं ? "

माझा तो सवाल ऐकतांच तिच्या चेहऱ्यावर क्षणमात्र भीतीची अभ्रं डोकावून गेलीं. पण लगेच दुसऱ्या क्षणीं ती तेवढ्याच जोरानं म्हणाली, " आपणाला ही गोष्ट शक्य करायला फार प्रयास पडतील. आपला इथं बसण्याचा हट्टच असेल तर मीही तितकाच प्रतिकार करीन. मी किती दृढनिश्चयी आहें हें समजेलच आपल्याला. " असें म्हणतच तिनें फराळाचें साहित्य आणखीच आजूबाजूला सारून सारून ठेवलें.

" आपला हा हट्ट—हा दृढनिश्चय आपल्या पतिराजांना दाखवा. इथं तो चालणार नाहीं, समजलांत ? " मी संतापून ओरडलों.

हा देखावा पाहून ताई भेदरूनच गेली. ती घाबरत म्हणाली, " जाऊं दे भाऊ, पुढल्या स्टेशनवर जागाच बदलूं या. कशाला उगीच भांडणतंटा करतोस ? "

" वा: योग्य सल्ला. ऐका यांचें थोडं तरी. "

उगीच बोलण्यांत वेळ घालवण्यापेक्षा कांहीं तरी कृतीनेंच करावें म्हणून मी तिच्यापाशीं आलों. तिचा पोळ्यासाखरेचा डबा, फळांची करंडी झटकन् उचलून बाजूला सारून दिली, व ती प्रतिकार करावयाच्या आंतच मी तेथेंच मांडी ठोकून बसलों. ही सर्व घटना एका क्षणांत घडून आली. तिला बोलायला कीं कांहीं करायला सवडच मिळूं दिली नाहीं. ती नुसत्या तांबारलेल्या डोळ्यांनीं पहात होती.

" हं, ताई, ये बैस इथं. वाटल्यास मी उभा राहतों पण तूं आरामांत बैस इथं. " ताई आल्यावर झटकन् उठून मी तिला जागा करून दिली. ती सुखासीन बसलेली पाहून मीं विजयोन्मादानें त्या मुलीकडे पाहिलें व खंबचटपणानें म्हटलें, " कांहो, तुम्हीच म्हणतां कीं मी फार दृढनिश्चयी आहे. पण कृतींत तर तसं काहींच दिसत नाहीं. आतां खुशाल फराळ करा आपण. पाणी बिणी कांहीं पाहिजे असेल तर तसं सांगा. गाडी थांबतांच हा फिरकीचा तांब्या भरून आणतों. आतांच दिलं असतं पण यांतलं पाणी उष्टं आहे—माझं. "

यावर तिनं बोलण्याऐवजीं एक जळजळीत कटाक्ष फेंकला. खरोखरच जर त्यांत पूर्वीच्या ऋषीसारखें जाळून भस्म करण्याचें सामर्थ्य असतं तर तिथंच माझी दीड चिमटी राख झाली असती; पण परमेश्वराला माझी काळजी.

माझ्या त्या 'पराक्रमा' चा मात्र डब्यांतील लोकांनीं शाबास

अशा नजरेनं पाहून गौरव केला. मूठभर मांस चढल्यासारखें वाटलें मला !

क्षणभरानें ती उठली. आजूबाजूला पडलेलें फराळाचें सामान फराळ न करतांच पुनः आवरून ठेवलें. ट्रंकेवर पडलेलें मघाचें पुस्तक घेऊन तिनें पुनः आपल्या तोंडापुढें धरिलें. तिला वाटलें असावें ह्या दांडग्या माणसाचें तोंड देखील पहाणें नको. ह्या वेळेस तिचा चेहरा संध्याकाळच्या पांढऱ्या अभ्रशकलाप्रमाणें तेजहीन दिसत होता. गाडीच्या वेगामुळें बसणारे धक्के तिच्या मोत्यांच्या कुड्यांच्या भारानें किंचित् वांकलेल्या कानाच्या पाळ्यांना हलवीत होते.

कांहींच न होतां चार एक स्टेशनें पार पडलीं. मघाच्या अपमानाचें शल्य मात्र तिच्या मनांत घोळत असावें असें तिच्या अस्वस्थ झालेल्या मुद्रेवरून दिसत होतें. एकदां पुस्तक वाचल्यासारखें करी, तर दुसऱ्याच क्षणीं एकदम मिटून समोर रानांत दाटणाऱ्या काळोखाकडे टक लावी. तोंडावर उडणाऱ्या केसांना डाव्या हातानें सारीत ताईकडे चमत्कारिक दृष्टीनें पाही, तर माझी नजर चुकवून माझ्याकडे एखादा नजरेचा झोत सोडी. काय करावें नि काय करूं नये असें तिला होऊन गेलें. तिच्या या हालचालीकडे मी सारखा पहात होतों.

तितक्यांत काय झालें कोणास ठाऊक. इतका वेळ झोपलेला शाम एकदम किंचाळून उठला. भूक लागली असावी म्हणून ताईनें त्याला पदराखालीं धरिलें. पण दूध पिण्याची त्याची लहर लागेना. त्यानें आपला 'आ' प्रसरला. मांडीचा झोपाळा करून ताईनें त्याला झुलवायचा प्रयत्न केला. परंतु काय झालें कोणास ठाऊक त्याचें रडें

कांहीं आवरेना.

" काय बाई कार्ट रडतंय्, फुटून गेलं अगदीं डोकं. " कपाळा-वर लाख आठ्या फुलवून ती मुलगी मोठ्यानेंच पण स्वतःशीं म्हणाली. " अजून तासभर रडेल तर माझ्या कानाचे पडदे कांहीं शाबूद राह-णार नाहींत. ऽ ऽ ऽ ग बाई किती कर्कश ! "

'कार्ट' हा शब्द ऐकल्याबरोबर ताईच्या डोळ्यांत निखारे फुलले. तिला कुणी लाख शिव्या दिल्या असत्या तरी तिनें त्या शांतपणानें झेलल्या असत्या. पण तिचा गोजिरवाणा शाम. त्याला कार्ट म्हटलेलं तिच्या हृदयाला कसें ऐकवणार ? तिचा शांतपणा एकदम मावळला. क्रोधानें ती म्हणाली, " तोंड आवरा आधीं आपलं. कुणाला कार्टे म्हणतां ? माझ्या या सोनुल्याला ? जीभ झडून जाईल बरं ! ल्हान मूलच आहे, रडल्याशिवाय कां रहाणार आहे ? तुम्ही स्त्री असून देखील असें उद्गार तुमच्या तोंडून बाहेर पडावेत ? अन् तुमचीं मुलं तरी का रडल्याशिवाय मोठीं होणार आहेत ? "

डावा पाय खालीं आपटून ती म्हणाली, " मुलं-माझी मुलं " आणि यावर ती असें विचित्र हंसली कीं, जणूं आपल्याला मुलं होणं ही अत्यंत लांछनास्पद गोष्ट आहे. " कां मुलांचा अगदीं तिटकारा वाटतो वाटतं ? कसं व्हावं मग तुमचं ? श्रीमंत स्त्रियांच्या कपाळाची एक वेळ चूल सुटेल पण मूल कांहीं सुटणार नाहीं. आतां आपण आजन्म कुमारीच रहाणार असाल तर "—

" चूप बसा एकदम. लोकांच्या नसत्या उठाठेवी करायला कांहीं वाटत नाहीं ? आधीं आपल्या रडक्याचं तोंड थांबवा. " कानावर दोन्ही हात दाबून अंग शहारल्यासारखं करीत ती म्हणाली, " थांबवा

म्हणत्यें ना त्याला. अग बाई ग काय कर्कशपणा हा ! छे छे डोकं फुटलं अगदीं. ”

“ फार नाजुक दिसतंय आपलं डोकं. इथं इतकीं माणसं बसलीं आहेत त्यांना काय डोकींच नाहींत ? होत असेल त्रास तर नाइलाज आहे. त्यापेक्षां उत्तम मार्ग म्हणजे सरळ दुसऱ्या डब्यांत जाऊन बसणें. पहिल्या वर्गांत जाऊन बसाल तर फारच छान होईल. निवांतपणाही असतो नि डोकें कलकललें असलें तर वारा घ्यायला पंखाही असतो तेथें. ”

महिषासुरमर्दिनीचा अवतार आणून ती ओरडली, “ बसायला जागा दिली त्याचे उपकार फेडतां वाटतं ? कांहीं वाटत नाहीं बोलायला असं ? जागा दिली नसती तर कैद्यासारखी उभी राहायची सक्तमजुरीची शिक्षा भोगीत होतांच कीं. ”

“ तर तर ह्या आख्या डब्याची खरेदी घेतलीय तुम्हीं. आम्हीं दीनपणानें फूटभर जागेसाठीं डोळ्याला पाणी आणल्यावर कृपाळू होऊन तुम्हीं इथें बसायला परवानगी दिली, असेंच ना ? गाडी जशी आपल्या मालकीचीच असा आव आणतां कीं. ”

“ छे छे माझी कसली ? आपल्याच तीर्थरूपांनीं काल खरेदी करून टाकलीय; मग मला कुठची मिळणार ? ” यावर ती असें कुत्सित हंसली कीं, इतका वेळ शांतपणानें वहाणारें माझें रक्त एकदम गरम झालें.

“ आपलं मन इतकं क्षुद्र असेल असं मला वाटलं नव्हतं. मघापासून आपण प्रत्येक शब्दाला प्रतिशब्द देत आहांत. आतां तर माझ्या तीर्थरूपांची आठवण केलीत. म्हणून पुनः सांगतों कीं, आपण

स्त्री आहांत हें न जाणतां माझ्या तोंडून रागाच्या भरांत कोणते शब्द निघून जातील याचा भरवंसा नाहीं. "

" वा ! एखाद्या मवाल्यासारखी धमकी देत आहां कीं. "

माझें रक्त एकदम उसळलें, " मवाली ? मी मवाली ? तोंड बंद करा एकदम. "

"आणि तुम्हीहि एक पाऊल पुढें टाकाल तर खबरदार ! गाडीच्या साखळीचा उपयोग केव्हां करावा ह्याची मला जाणीव आहे. "

गाडींतील वातावरण एकदम गंभीर झालें. सर्व लोक आमच्याकडे टकमका बघूं लागले. ताईची मुद्रा भीतीनें पांढरीफटक पडली.

" तुमचे शब्द परत घ्या आधीं. मवाली म्हणतां मला ? ते शब्द आधीं परत घ्या. "

" परत ? हुं ! परत घेण्याऐवजीं गाडी उभी राहिल्याबरोबर तुम्हालाच देतें पोलीसाच्या ताब्यांत माझ्याशीं असभ्य रीतीनें वागल्याबद्दल. संभावित रीतीनें स्त्रियांशीं कसें वागावें ह्याचे धडे गिरवा त्याच्याकडून. "

तिचा हा कांगावखोरपणा पाहून मला भयंकर त्वेष आला. हीच मला पोलिसाच्या ताब्यांत देणार ? माझेंच असभ्य वर्तन ? संतापानें मी बेभान झालों. कसलाच विचार माझ्या मनांत टिकेना. साऱ्या अंगांत वणवा पेटल्यासारखा झाला. मस्तकाच्या शिरा ताड्ताड् उडूं लागल्या. त्या भरांत मी काय करतों आहें हें मला समजण्यापूर्वीच माझे हात तिच्या गालावर आदळले. " खाड् खाड् "—विजेच्या झटक्याप्रमाणें मी त्या आवाजानें शुद्धीवर आलों.

क्षणार्धांत गाडी थांबली. त्याबरोबर ती धांवतच बाहेर गेली. लगेच

गार्डला व एका पोलिसाला बरोबर घेऊन आली. माझ्याकडे बोट दाखवून ती ओरडलीच " हाच, हाच तो बदमाष, मारलंन् मला. हलकट मेला हा, अग आई ग—" गाल चोळीत तिनें जळजळीत कटाक्षांचा वर्षाव केला. पोलिसानें चटकन् येऊन माझी मानगुट पकडली. दोन तीन इरसाल शिव्या देऊन मला गाडीच्या बाहेर खेंचण्यासाठीं ढकललें. तों गार्डसाहेब आतां काय शोभा करतात या आशंकेनें मीं त्यांच्याकडे पाहिलें. गार्डसाहेब तर जरासे निरखूनच माझ्याकडे पाहूं लागले. जरा निरखल्यावर ते म्हणाले, " तूं वामन—वामन्या नाहींस कां? अन् लेका असा मवालीपणा केव्हां सुरूं केलास ? शाळेबरोबर सभ्यपणाहि सोडलास काय ? "

तुरटी समजून आंबट तोंड करावें तों, तो खडीसाखरेचा तुकडा निघावा तसें मला त्या शब्दानें झालें. डोकें ठिकाणावर आणून मी पाहिलें तों इंग्रजी सहावींतून पळून गेलेला बंड्याच गार्ड म्हणून माझेपुढें उभा होता. त्याला पाहातांच मला जरासें हायसें वाटलें. रागाच्या भरांत कां होईना माझे हांतून अपराध घडला होता. आपल्याला कुणाचा तरी पाठिंबा आहे या कल्पनेनें माझा जीव थाऱ्यावर आला. मी म्हणालों " माझ्या स्वभावाची तुला खात्री, नाहीं कां ? बंडू माझ्या भित्रेपणाबद्दल लहानपणीं तुम्ही सारे विद्यार्थी माझी किती थट्टा करीत असा. कांहीं तरी कारण घडल्याशिवाय कां माझे हांतून हा अविचार झाला ? प्रथम ह्यांचेकडून चूक झाली. वाटल्यास सारा डबा माझेतर्फे साक्ष देईल. तूंच विचार ह्यांना काय झालें म्हणून. "

" काय झालें ग विमे " तिच्याकडे वळून बंड्यानें विचारलें, " वामन कांहीं असा मनुष्य नाहीं एकदम कुणावर हात टाकणारा.

नीट सांग मला लौकर. "

अग तुग म्हणण्याइतका बंड्याचा त्या मुलीशीं परिचय पहातांच मी जरासा थबकलों. कोण असावी बुवा ही ह्याची ?

" बंडूआण्णा, मी तरी खोटं कां सांगेन तुला ? तूं मला कष्टानें करून दिलेली जागा ह्यांनीं आडदांडपणा करून बळकावली तर मला कां राग येणार नाहीं ? माझ्या फराळाचं सपशेल फेंकून देऊन एकाद्या दांडगेश्वराप्रमाणें ह्यांनीं केलेलं वर्तन मी मुकाट्यानं पाहून घेऊं ? माझा भाऊ गार्ड असतांना माझा असा अपमान व्हावा ? तूंच सांग."

" ओः एकंदरींत ही त्याची बहिण तर ! "

पोलिसला आणि गार्डाला पाहून ताईचा जीव एवढासा झाला होता. भीतीनें तिचें सर्वांग कापत होतें. होणार तरी काय पुढें अशा आशंकेनें तिचा जीव बावरून गेला होता. शामला घट्ट धरून ती केविलवाणीनें माझ्याकडे पहात होती. ती रुद्ध स्वरानेंच म्हणाली " मी सांगत्यें काय झालं तें गार्डसाहेब, पण माझ्या भावाला असा त्रास देऊं नका हो. "

आणि अडखळतच तिनें जेव्हां सर्व प्रकार सांगितला तेव्हां मात्र बंड्या आपल्या नात्याची पर्वा न करितां शाळेंत असतांना दुपारच्या सुट्टींत खाल्लेल्या मस्कास्लाईसला जागला. विमलकडे पहात तो कठोरपणानें म्हणाला, " विमल, तुझ्या अंगांत एवढी साधी माणुसकी असूं नये ? मी गार्ड म्हणजे का गाडीचा मालक आहे ? म्हणून तूं एवढी अरेरावी दाखवावीस ? उलट तुझ्यापेक्षां त्यांनाच त्या जागेवर असण्याचा हक्क आहे. त्यांनीं पैसे खर्चले आहेत आणि तूं तर निव्वळ फुकटी. " आणि ताईकडे पहात पुढें म्हणाला, " ही तुझी बहीण

नाहीं रे ? आपण शाळेंत होतों त्यावेळेस विती लहान होती. आतां अगदीं ओळखूं देखील येत नाहीं कीं. हा तिचा छोकरा वाटतं. "

मूकपटांतील एकाद्या पात्रासारखा पोलीस उभा होता. माझ्या मानेवर हात ठेवून तो आतां आपण कोणती भूमिका घ्यावी ह्याचा विचार करीत होता. तो अशा चिंतेंत आहे तोंच बंड्या म्हणाला, ' माने, आपली तूर्त जरूरी लागेल असं दिसत नाहीं. मीच ह्या बदमाषाचा समाचार घेणार आहे, जा तुम्ही. "

टोला हाणण्यासाठीं हात खूप हवेंत उगारावा तोंच हातोडी हातांतून निसटून जाऊन उलट हाताला मात्र धक्का बसावा तसें बिमलला झालें. क्षणभर तिला आपल्या वर्तनाची लाज वाटली. पिंवळया जर्द गव्हाच्या राशीवर ढगानें सावली धरावी तसें तिचें मुख काळवंडलें.

पोलीस जातांच बंड्या म्हणाला, फारच फाजील झालीय् बिमल अलीकडे. मुंबईला मामांच्यापाशीं राहिल्यापासून पुरुषांशीं दोन हात करण्याची खुमखुमी आली तिला. समान हक्क ना? समान हक्काप्रमाणें वागायचें तर वेळीं प्रसंगीं पुरुषासारखा मारही खायला पाहिजे. बायकांसारखी रडारडी काय कामाची? दोनतीन वर्षे जबलपुरला होतों; ह्मणून तुझ्यावर मला नजर ठेवतां आली नाहीं. " कांहींतरी मनांत विचार आल्याप्रमाणें करून त्यानें मला विचारलें, " वामन्या, लेका, लग्न झालंय् कारे तुझं ? "

मी मानेनेंच नाही म्हटल्यावर मात्र त्याची जीभ आगगाडी-सारखी चालूं लागली. " ओ दॅटस् गुड्. आतां घरीं गेल्याबरोबर बाबांना सांगून ही भांडखोर ब्याद घराबाहेर काढून टाकली पाहिजे.

नाहींतर माझ्याशींच भांडूं लागायची. विमे, थांब हो ह्या दांडगेश्वराच्याच ताब्यांत देऊन टाकतों तुला. ह्याच्यासारखा उठतां लाथ नि बसतां बुक्की देणारा नवरा मिळाला तरच तूं वठणीवर येशील. ये रे बामन, मी तुम्हांला जागा करून देतों रेल्वेचा गार्ड म्हणून."

इतका वेळ चुरुचुरु बोलणारें विमलचें तोंड घट्ट मिटलें गेलें होतें. डोळेच फक्त बोलत होते. "मीच तेवढी भांडखोर नि हे काय कमी आहेत–मारलं मला." नकळतच तिचा हात गालावर फिरून आला.

आणि ह्या गाडींतील चकमकींत एकही मनुष्य ठार न होता उलट पंधरा एक दिवसांनीं आमच्या घरांत मात्र एक मनुष्य वाढलाच. परमेश्वर माझ्या हाताला सामर्थ्य देवो !

## मानलली मुलें : : २

सतत महिनाभराच्या पावसाच्या कुरकुरीनंतर आज थोडी उघाड पडली होती. सूर्याचे किरण आज पृथ्वीला भेटायला आले होते. आभाळ कसें स्वच्छ होतें ! मनहि निसर्गाच्या प्रसन्नतेनें महिरून गेलें होतें. मधुरा आंतल्या खोलींत चहा करीत होती व मी नुकत्याच आलेल्या 'रेखा' मासिकातील चुटके वाचण्याचा प्रयत्न करीत होतों. प्रयत्न करीत होतो म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, हातांतील मासिकाकडे माझें बिल्कूल लक्ष नसून आंत वाजत असलेल्या स्टोव्हच्या फुर्र्र अशा आवाजाकडे नी मधुरेच्या मधुर कंकणरवाकडे लागलें होतें. मधुरेनें असें सक्त फर्मान जारी केलें होतें कीं, स्वयंपाकघरांत नीट पाट मांडून घासूनपुसून चक्क केलेल्या जर्मन सिल्व्हरच्या कपबशांची मांडामांड केल्याशिवाय मला आत पाऊल टाकण्याची सक्त मनाई आहे ! कारण मी तसाच आंत गेलों नी अशी व्यवस्था नसली तर मी स्वतःच पाटबीट घेऊन बसत असे. स्वयंपाकघरांतील माझ्या कोणत्याहि कृतीवर तिचा मोठा कटाक्ष असे. ती म्हणे, ' तुम्हींच या गोष्टी स्वतः करून घेतल्यावर आम्हीं मग काय करायचं ? या प्रांतांत आम्हीं सांगूं तसंच तुम्हीं वागलं पाहिजे. तुमच्या कचेरीच्या कामात आम्ही येतों का लुडबूड करायला ? ' मला वाटे, बरोबर आहे हिचें म्हणणें, म्हणून मीहि तिच्या कलानेंच वागत असे या बाबतींत तरी.

स्टोव्हचा आवाज बंद होऊन कपबशांची खडबड होऊं लागलेली ऐकूं येतांच हातांतला अंक तसाच फेंकून देऊन मी तडक आंत गेलों

आणि माझ्या नेहमींच्या पाटावर बसून तिनें दिलेला चहाचा कप रिकामा करण्यास सुरवात केली. एक-दोन घोट घेतलेले पाहतांच मधुरेनें नित्याप्रमाणें आपल्या चहांतील प्राविण्याबद्दल पुन्हां एकदां माझ्याकडून उल्लेख व्हावा म्हणून विचारलें, " कां ? कसा काय झाला आहे चहा ? "

मीं तोंड वेडेंवांकडें करीत म्हटलें, " अगदीं इराण्याच्या हॉटेल-मधल्या चहासारखा झाला आहे. "

" म्हणजे ? मीं ऐकलं आहे ते लोक चहाला चव येण्यासाठीं त्यांत अफूचं पाणी घालतात. एकदा चट लागली कीं पुन्हां गिऱ्हाइकं यावींत म्हणून. "

मी शांत चित्तानें म्हणालों, " होय. म्हणूनच मीं म्हटलं. "

" अय्या ! " शरिराला एक नाजूक हिसडा देऊन ती म्हणाली, "अफूचं पाणी का यांत घातलंय् मीं ! छानच आहे परीक्षा म्हणायची !"

" अफूचं पाणीच काय, पण यांत प्रीतीच्या द्राक्षासवाचे बुधले ओतले आहेत. अफू एक वेळ बरी; पण हें तर द्राक्षासव ! अशी फसवाफसवी करून एखाद्याला लुब्ध करायचं हें कमी का पाप आहे ? सध्यांच्या कॉंग्रेसच्या राज्यांत पूर्ण दारूबंदीची मोहीम सुरू आहे अन् तूं मात्र अशी लबाडी करून नियमभंग करते आहेस. कुणाला समजलं तर पटकन् शिक्षा होईल ना एखादे वेळीं. "

काळेभोर डोळे किंचित् बारीक करून ती म्हणाली, " अन् पिणारा तरी त्यांतून सहीसलामत सुटेल का ? इश्श, राहूं द्या तें. खरंच सांगायचं, झालाय ना छानदार चहा ? माझी आजी तर नेहमीं म्हणायची कीं, चहा करावा काळीनं नी ऐट करावी सगळ्यांनीं ! "

" काळीनं ? म्हणजे कशीं ? " मीं आश्चर्यानें विचारलें.

मोहक लाजून ती पुटपुटली, "मीच ! मलाच आजी लाडकेपणानं काळी म्हणत असे. कमळीचं काळी केलं तिनं."

"वा ! काय गोड नी आकर्षक नांव आहे ! काय म्हणे काळी ! सिनेमानटींचीं नांवेंदेखील इतकीं गोड नसतात !"

माझ्या तोंडावर हात ठेवून ती लगेच म्हणाली, "माझ्या माहेरचें नांव आहे तें. त्याची चेष्टा नाहीं हं करायची ! नाहीं तरी मी म्हणतें, आपल्याला मामंजी ज्या नांवानं हांक मारतात तें नांव तरी काय मोठं गोड आहे ? सांगा ना ?"

अज्ञानाचा आव आणून मी विचारलें, "बाबा मला कोणत्या नांवानं हांक मारतात बुवा ? प्रभाकर म्हणतात मला. वाईट कां तें नांव आहे मग ? वा: ! न्यूटनपेक्षांदेखील मोठी शोधक झालीस म्हणायची तूं !"

"इश्श ! सासूबाई त्या नांवानं हांक मारतात; पण मामंजी ? काय म्हणतात सांगू ? हंसून हिणवायचं नाहीं हं ? सांगूं–सांगूं–धों–धों...." पण लज्जेनें घात केलाच.

"हं हं धोंड्या होय ? अरेच्या, खरंच कीं ! विसरून गेलों होतों मी. बाकी जोडा मात्र बेश आहे आपला ! तूं काळी नी मी धोंडा ! यंबूरे पण एवढ्या खटाटोपांत तूं आर्यमहिलेचं तेज घालविलंस नवऱ्याचं नांव घेऊन–त्याला धोंड्या, दगड्या म्हणून ! समजा, एक आपली नुसती कल्पना बरं कां, उद्यां आईला कळलं कीं, तूं मला धोंड्या म्हटलंस, तर बिचारी काय म्हणेल ?"

आपल्यापुढील किटली पलीकडे ठेवीत मनांत दचकून पण बाह्यत्कारीं बेदरकारीनें तिनें म्हटलें, 'त्यांना कसं कळणार ? अन्

कळलं तर कळलं. कांहीं फांशी तर देणार नाहींत! उलट तुम्हांला मात्र बायकोच्या इतक्या आवीन झाल्याबद्दल कानपिचक्या मिळतील.'

एवढें आम्हां बोलत आहोंत तों आमच्यापलीकडे नुकत्याच रिकाम्या झालेल्या बिऱ्हाडीं कांहीं कुजबूज झालेली ऐकूं आली. कुणीतरी नवीन बिऱ्हाडकरू आलेले असतील व ते आहेत तरी कोण या जिज्ञासेनें मी बाजूच्या खिडकींतून पाहूं लागलों. वरच्या मजल्यावर दोनच बिऱ्हाडकरूंची सोय होती. एक जागा आम्ही भरून टाकली होती व दुसरी नुकतीच दोन दिवसांपूर्वी रिकामी झाली होती. खालच्या बिऱ्हाडकरूंपेक्षां याच बिऱ्हाडकरूंशीं आमचा निकटचा संबंध येत असे; म्हणून आतां येऊं घातलेलें बिऱ्हाड कसें काय असेल याबद्दल माझा विचार चालला.

नवीन येणारें बिऱ्हाड खालीं गाडींत असलेलें सामान वर आणून टाकण्याच्या धांदलीत होतें. इनमीन तीन माणसें होतीं तीं. एक पन्नाशीच्या घराला आलेला वृद्ध, त्याची बायको नी एक वेडसरसा दिसणारा दहाअकरा वर्षांचा मुलगा. म्हातारा गाडींत असलेलें सामान पायरीवर ठेवीत होता व तीं दोन माणसें हातांत मावेल व जिवाला झेपेल एवढं सामान घेऊन वर नेऊन ठेवीत होती. सामानहि कांहीं कमी नव्हतें. एकाच गाडीवानानें चार हेलपाटे केले. शेवटच्या खेपेस गाडी रिकामी झालेली पाहून गाडीवानानें ओढून तंग केलेला बैलाचा कासरा जरा ढिला केला व म्हणाला—

"रावसाहेब, मोकळं करा पाहूं जलदी मला. पुन्हां टेशनला जायचंय हुंडेकऱ्याच्या वर्दीला."

म्हातारा म्हणाला, "अन् हें कपाट, ही बॅग, हा पाळणा सारं

सामान वरतीं कुणीं नेऊन ठेवायचं? तूं कीं मी?"

"म्यां काय नाय् म्हणतुया? तुमी सांगितल्याबिगार कसं नेयाचं?" असें म्हणून गाडीवानानें खालीं असलेलें सर्व सामान वर माडीवर नेऊन ठेवलें. आपल्या मुंडाश्याबर पडलेली धूळ झटकीत त्यानें पैशासाठीं हात पसरला.

ऐटीनें कोटाच्या आंतल्या खिशांत असलेलें पैशाचें पाकीट म्हाताऱ्यानें काढलें. त्यानें पाहिलें तों त्यांत साऱ्या नोटाच. खुर्दा-नाणें म्हणून नाहीं मुळींच! दहाची एक नोट काढून त्यानें गाडीवानापुढें धरीत विचारलें, "मोड आहे एवढ्याची!"

"धा रुपैची? गरिबाजवळ कशी रहावी साहेब एवढी मोड? धा आणं दिसत न्हैती, तवा धा रुपै कसं यावं?"

"मग आण मोड कुठूनतरी," तशीच नोट हातांत धरून म्हाताऱ्यानें ऐटीनें तोंड फिरविलें, तोंच आम्हीं दोघेहि त्याच्या दृष्टीस पडलों. एकादी जुनी ओळख असल्याप्रमाणें त्यानें हंसून जिव्हणी विस्तृत केली व खालूनच विचारलें! "अं, अं! आपल्या-पाशीं आहे कां मोड दहाची?"

होऊं घातलेल्या शेजाऱ्याच्या पहिल्या प्रथमच उपयोगीं पडून आपण आपलें सौजन्य नी उपकारशील वृत्ति त्याच्या नजरेस आणून त्याच्यावर छाप टाकावी अशा हेतूनें मी म्हणालों, "मोड नाहीं; पण आपल्याला गाडीवानाला देण्यासाठीं हवे असले तर आहेत दोनएक रुपये. किती द्यायचेत त्याचे?"

"दोनच द्यायचे आहेत."

"बरंच झालं. मग मोडल्यावर केव्हांहि परत केले तरी चालतील."

" ओः थँक्स थँक्स--" असें पुटपुटत म्हातारा वर आला. त्याला एक खुर्ची देऊन मी मधुरेला म्हटलें, " माझ्या पेटींतले पैसे घेऊन ये पाहूं. "

ती आंत जातांच म्हाताऱ्यानें हळूंच विचारलें, "आपलं कुटुंबच ना?"

" हो. " मीं हंसून म्हटलें. " आम्ही इथं दोघंच असतों. बाकीची मंडळी आमच्या गांवीं असतात. मी बँकेंत असतों इथल्या. आपण इंथ कुठं असतां ? "

" नुकताच मी बदलून आलों आहें इथं. कोर्टांत असतों मी. आणि काय योगायोग आहे पहा. तुमच्या कुटुंबाला पाहिलं मात्र, आमच्या कुमुदची आठवण झाली मला. आतापर्यंत जगती तर थेट अशीच दिसली असती. पण नाहीं पाहवलं देवाला ! काय करायचं? देवाच्या इच्छेपुढं का इलाज आहे ! " म्हाताऱ्यानें एक दीर्घ सुस्कारा सोडला. इतक्यांत मधुरेनें आंतून आणलेले रुपये म्हाताऱ्याला देऊन मी आपल्या उद्योगाला लागलों.

संध्याकाळीं मुद्दाम आवडीचे तयार केलेले गुलाबजाम व बटाटे-पोहे मी आणि मधुरा खात बसलों होतों. खातांना अर्थातच शेजाऱ्याबद्दलच्या गप्पा चालल्या होत्या. मधुरा सांगत होती. " जेवण झाल्यावर ती म्हातारी कामाचा पसारा तसाच टाकून आपल्याकडे आली. ती आल्यावर मी म्हटलं, ' काय काकू, घर बरं आहे ना?' त्यावर ' आहे आपलं ठीक ' काकू म्हणाल्या, ' आम्हाला आतां जगांत फार दिवस काढायचेत थोडेच ! एकेक दिवस आपला ढकलायचा. चांगलं काय नी वाईट काय ! सारं सारखंच. देवानंच पाठ फिरविल्यावर कशाची अपेक्षा करायची ? नाहींतर चांगला

हातातोंडाशीं आलेला मुलगा; खोटं सांगत नाहीं तुम्हांला. तुमच्या यजमानांना पाहिलं तेव्हां त्याची आठवण झाली मला अन् असं कांहीं भडभडून आलं म्हणतां ! सारखी आठवण व्हावी नी वाटावं कीं गोविंदा कांहीं गेला नाहीं, आहे आपल्या शेजारालाच इथंच."

"असंच बोलला तो म्हातारा." मधेंच तिला थांबवून मी म्हटलें, "तुला पाहिल्यावर त्याला आपल्या गत मुलीची आठवण झाली. दैवाच्या आघातानं दुःखी झालेलीं दिसताहेत बिचारीं ! म्हणत असलीं आम्हांला मुलगा–मुलगी तर कशाला त्यांच्या सुखाआड या ? काय, खरं ना ?"

"हो ! नाहींतर काय ? या परगांवांत कोणीतरी वडील माणूस हवंच होतं आपल्याला धाक दाखवायला, धीर द्यायला !"

"आपल्याला म्हणूं नकोस. तुला स्वताला म्हण. कारण भित्र्याला धीर द्यावा लागतो, धैर्यवानाला नाहीं."

"मी भित्री ! अन् धैर्यधराचे अवतार ना आपण ? मग परवां बसायच्या पाटाखालीं विंचू निघाला तेव्हां त्याला मारण्यासाठीं मला कशाला हांक मारली अगदीं घाबरून जाऊन !"

"घाबरून ? छत् ! माझ्या मनाचा बेसावधपणानं थोडासा तोल गेला एवढंच. मोठमोठे अट्टल सायकलस्वारदेखील क्षुल्लक कारणानं खालीं येतात; मग मी तर– बरं, जाऊं दे तें. पुढं काय म्हणाली ती म्हातारी ?"

"ती म्हणाली– 'घर मोठं टापटिपींत ठेवलंय् तुम्हीं. पण घरांत कुठं पाळणा दिसत नाहीं ?' या म्हाताऱ्या बायांना दुसरं कांहीं दिसतच नाहीं. थोड्या वेळानं ती पुढं म्हणाली, 'आम्हीं बिऱ्हाड बदललं कीं

नव्या घराच्या वास्तुपुरुषाच्या शांतीसाठीं गव्हल्यांची खीर नी गुळाच्या पोळ्या करतों. आमचा आपला तसा समज आहे. माझे सारे सोवळ्यांतले गव्हले त्या मेल्या गाडीवानानं विटाळून टाकले. काय उपयोग आपल्याला त्याचा? टाकले त्यालाच देऊन. पहिल्याच दिवशीं तो नैवेद्य दाखविल्याशिवाय अन्नग्रहण करीत नाहीं आम्हीं. म्हणून म्हणतें, तुमच्याजवळ असले थोडेसे गव्हले तर द्या सध्यांला. उद्यांपरवां सवड मिळाल्यावर तुमचे परत करीन.' मग मीं दिले त्यांना आपल्या-जवळचे गव्हले आणि एक शेरभर साखरहि दिली त्यांत घालायला. उद्यां परत करीन म्हणाल्या त्या."

तिच्या बशींतील एक गुलाबजाम उचलून खात मी म्हणालों, "ह्या गांवाला तुला वडील नी मला आई मिळाली. मोठा अलभ्य लाभच झाला म्हणायचा, नाहीं?" यावर आम्ही दोघेहि हंसलों.

* * * *

अलीकडे आमचे कचेरींतिल दोन कारकून आजारी असल्यामुळें कामाची अशी धांदल उडाली होती कीं, कांहीं सांगायची सोय नाहीं. सकाळींच आठ वाजतां जेवण करून गेल्यावर सायंकाळीं यायला क्वचित् नऊदेखील होत. माझी ही ओढाताण पाहून मधुरा "जळ्ळी ही नोकरी" म्हणून त्या नोकरीला दिवसांतून दहा वेळ तरी जाळून टाकीत असे. पांचसहा दिवसांनंतर ते दोन्ही कारकून आपल्या कामा-वर रुजूं झाले व माझा मेटाकुटीला आलेला जीव जरा हुषार झाला. त्या हुषारींत जिवाची मुंबई करण्यासाठीं परत घरीं जातांना चार आण्यांची वेणी घेऊन गेलों.

घरांत पाऊल टाकतांच मधुरेला एखाद्या तारेसारखा हुकूम सोडला,

" सिनेमा, जलदी, जेवण नंतर, आटप - "

गेंदेबाज वेणी पाहतांच हुरळून जाऊन मधुरा चीत्कारली, " अगबाई! सिनेमाला का जायचं? आणि आत्तांच्या? आधीं सांगावं कीं नाहीं! चहा तरी करून ठेवला असता. उगीचच इतका वेळ शेजारच्या रमाबाईशीं--नाहीं, तुमच्या आईशीं - बोलत बसलेंय! "

शेजारच्या बाईचें नांव काढतांच मला दोन रुपयांची आठवण झाली. कदाचित् म्हाताऱ्यानें माझी गांठ न पडल्यामुळें मधुरेजवळ ते दोन रुपये दिले असतील अशा समजुतीनें मीं विचारलें, " का ग, माझे त्या दिवशींचे दोन रुपये दिले का परत तुझ्याजवळ? "

" माझ्याजवळ? नाहीं बाई! नी तुमच्या शिव्या खाऊन वळलेले गव्हले नी शेरभर साखर तरी त्यांनीं अजून कुठं परत केली आहे? जाऊं द्या, म्हातारं माणूस आहे, विसरून गेले असतील कदाचित्. आपण मागितलं तर वाईट नाहीं का दिसायचं? "

माझ्या पुरुषी नी हिशेबी मनाला हें मुळींच मानवलें नाहीं. व्यवहार पैचा कां असेना, तो स्वच्छ, लख्ख पाहिजे. त्यांनीं ते दोन रुपये मीं न मागतां परत करायला पाहिजे होते, असें माझें व्यवहारी मन म्हणालें.

" अन् आज दुपारीं भाजीला मसाला नव्हता म्हणून दोन वाट्या मसाला नेला त्यांनीं. कुटल्यावर देईन म्हणाल्या त्या. " मधुरेनें सांगितलें.

इतक्यांत कोणाचीशी सावली पडली म्हणून पाहिलें तों उंबऱ्यावर म्हातारा येऊन उभा राहिला होता. मला पाहिल्यावर त्याला वात्सल्याचें भरतें आल्यासारखें दिसलें. अत्यंत आपुलकीनें तो म्हणाला, " हें काय

प्रभाकरपंत, अशी उरी फुटेपर्यंत का कोणी नोकरी करतात! अशानं शरीर टिकेल तरी कसं? तरुणपणांत मनुष्याला वाटते खरी हुंशारी, पण तीच म्हातारपणांत त्रास देऊं लागते. आपलं शरीरस्वास्थ्य राखून नोकरी करावी."

लगेच त्याच्या बायकोनें पाठीमागून साथ करीत म्हटलें, "नाहींतर काय! मधुराबाई बिचारी दिवसभर कशी गायीवाणी दिसत असे. किती काळजी करी. मला बाई त्यांचा चेहेरा बघितला कीं, कसंसंच होई. आपलं जपून संभाळून काम करावं."

मीं घड्याळाकडे पाहिलें तों सिनेमा सुरू व्हायला वीसएक मिनिटें कमी होतीं. ह्या उपदेशामृताचें संपूर्ण पान करायचें म्हटलें तर इथेंच सिनेमा खलास होऊन जायचा! म्हणून तशी डोळ्यानें मधुरेला खूण करून त्यांना हूं हूं करीत जामानिमा करूं लागलों.

मी आणि मधुरा दोघेहि तयार होऊन दारें बंद करूं लागलों तों म्हातारीनें विचारलें, "कुठं फिरायला कां?"

"छे, सिनेमाला. गोपाळकृष्णाला," मधुरा म्हणाली. "कां? यायचंय का बघायला?

हिचें नुसतें तोंडदेखलें बोलावणें ऐकतांच म्हातारा बायकोला म्हणाला, "जायचं आहे का तुला? जा हवी तर. माझा मी फराळ करून घेईन. मात्र जातांना रामूला बरोबर घेऊन जा. राहायचा नाहीं माझ्यापाशीं तो."

"देवाचा शिणीमा आहे म्हणतात. अत्यंत पुण्य लागेल बघितल्यावर. कामांत काम नी रामांत राम म्हणतात ना, तसं. आलेंच हं मधुराबाई एवढ्यांत." असें म्हणतच चांगलें लुगडें

नेसायला म्हातारी आंत गेली.

मग त्या सिनेमाला मी, मधुरा, ' आई ' नी तें ' कार्टं '—आणि त्या सर्वांचा खर्च माझ्याच अंगावर !

*     *     *

महिना झाला, पण माझे दोन रुपये, मधुरेचे गव्हले, एक शेर साखर परत येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना ! उलट ते आपल्या जोडीला वेळोवेळीं तूप, तेल असे दोस्त घेऊन जात. जसजसा त्या जोडप्याचा हा नुसता घेवाणीचाच कारभार दृष्टीस पडूं लागला, तसतसें माझें मन चमत्कारिक होऊं लागलें आणि दर वेळीं मागणी तरी किती चमत्कारिक नी क्षुल्लक ! तेवढ्याला आम्हीं नाहीं म्हटलें तर आमच्या मनाची क्षुद्रताच प्रगट व्हायची !

" असंच जर कांहीं दिवस चाललं तर आपलं या पगारांत कांहीं चालणार नाहीं इथं ! " मीं म्हटलें. "उलट बाबांकडूनच मनिऑर्डर मागवावी लागेल आणि मग बाबांकडून उत्तर येईल कीं, ' खर्च जास्त होत असेल, तर सूनबाईला इकडे पाठवून दे आणि संभाळून खर्च कर."

" मी जायला बसलेंय् ! उपाशी राहीन, पण इकडे सोडून राहणार नाहीं. "

" अग बये ! मी आहें आज्ञाधारक मुलगा. असा हट्ट धरून मला संकटांत नको पाडूं. बाबा आगगाडीनं तुला पाठवून दे म्हणाले तर मी विमानांतून पाठवून देईन. त्यांच्या आज्ञेपुढं मला माझ्या जिवाची देखील पर्वा नाहीं. "

" अहाहा ! काय पण आज्ञापालन ! बाबा नगरला राहा म्हणाले, तेव्हां मुद्दाम रागावून, रुसून इकडे कोण आलं ? माहीत

नाहीं कीं, काय मला ! उलट तुम्ही इकडे निघून आल्यावर त्यांनीं तुमच्यावर लक्ष वाहिले शिव्यांचे — अगदीं बाईलवेडा पोरगा म्हणून ! मला तर त्या वेळेला असं चोरट्यासारखं झालं होतं— ''

तिचे हात माझ्या हातांत घेऊन मीं प्रेमपूर्ण नजरेनें म्हटले, " पण एवढं आज्ञाभंगाचं भयंकर पातक मीं कुणाकरितां केलं ? मधुरा — ''

इतक्यांत खाडकन् दार उघडून म्हातारा आत आला. आम्हांला त्या स्थितीत पाहताच तो चपापून किंचित् मागें सरला. क्षणार्धात आम्ही बाजूला झालों.

हंसण्याचा निष्फळ प्रयत्न करीत म्हातारा म्हणाला " अं अं, मी कांहीं कोणी परका नाहीं. आपल्याला मी एक विनंति करायला आलों आहें आणि मला वाटतं आपण नाहीं म्हणणार नाहीं. ''

मला त्याचा रागहि आला होता आणि त्याच्या विनंतीबद्दल औत्सुक्य हि उत्पन्न झालें होतें. हा आणखी काय बरें मागेल? कांहींच कल्पना होईना !

माझी स्तब्धता पाहतांच तो पुढें बोलूं लागला, " तसं म्हणजे कांहीं विशेष नाहीं. आजपासून आमच्या घरीं शिवायचं नाहीं नी आमच्या सकाळच्या कचेऱ्या आहेत. तेव्हां एवढे चार दिवस आम्हांला संभाळून घ्या. खाणावळींतलं जेवण आमच्या जुन्या मनाला मानवत नाहीं आणि मला कचेरीमुळं सकाळीं स्वयंपाक करायला वेळ मिळणार नाहीं. आम्हीं तुम्हांला आमचीं मुलंच मानलीं असल्यानं आम्हां दोघांनाहि परकेपणा वाटत नाहीं. इतके दिवस उदासवाणं वाटत होतं तें तुमच्या शेजाराला आल्यापासून नाहींसं

झालं आहे. ”

चार दिवस जेवण्याचीच गोष्ट असल्यानें मला एकदम नाहीं म्हणवलं नाही. नेहमींप्रमाणेंच मी म्हटलें, “ त्यांत काय एवढं विचारायचं? खुशाल या चारच का, आठ दिवस राहा ना. आम्हांला तरी या परक्या देशात एवढ्या आपुलकीनं कोण वागवतं ? ”

“ नाही; पण आपलं विचारलं म्हणजे बरं ! ” असें म्हणत आनंदून म्हातारा निघून गेला.

तो गेल्यावर मधुरा किंचित् संतापून म्हणाली, “ माझ्यानं नाहीं होणार इतक्यांचा स्वयंपाक. रोजची चीजवस्त जातीय् ती थोडी झाली वाटतं ! राजा हरिश्चंद्राचा नवा अवतार प्रकट झाल्यासारखा दिसतोय् ! ”

“ राणी तारामती, तूं कांहीं म्हण, पण माझ्यानं कांहीं नाहीं म्हणवलं नाहीं. बोलल्यासारखे एवढे चार दिवस संभाळून घे म्हणजे झालं. मग मात्र त्यांना गव्हाचा एवढासा दाणादेखील देऊं नकोस. ”

“ गहूंच काय, पण फाटकी चप्पल मागितली तरीसुद्धां देणार नाहीं. नुसतं मानभावीपणानं मुलंमुल करून आम्हांला बुडवायचं ! आत्तांपर्यंत नेलेल्या जिनसापैकीं एकदेखील परत केली नाहीं. तसे कांहीं दरिद्री नाहींत ते. चांगला पाऊणशें रुपये पगार आहे. पण एकेकांची वासनाच वाईट. ”

“ मरूं दे तें. मला जेवायला वाढ आधीं. “ मी उठत म्हणालों.

चार दिवसच जेवायला येणारें तें जोडपें माझ्या बोलण्यांतील आठ दिवस पकडून बरोबर आठ दिवस राहिलें आणि त्या आठ दिवसांत आठ प्रकार केले ! आज काय एकादशी, आज काय धान्य-

फराळ, आज काय द्वादशी आणि दर द्वादशीला आम्हीं पुरण करतों म्हणून करा पुरणाच्या पोळ्या !

असें सतावून सोडलें त्यांनीं, कीं कुठून मीं सहानुभूति दाखविली असा माझा मलाच पश्चात्ताप झाला ! आणि गरीब बिचारी–मधुरा दिवसभर ती चुलींतच गुंतलेली असे. दहा वाजतां माझें जेवण व्हायचें, मग अकराला तो म्हातारा यायचा, तिथून देवपूजा, नैवेद्य, वैश्वदेव–चांगला दीडएक वाजायचा त्याच्या या घटपटादि लटपटीला, मग जेवण नी मग आवराआवर ! मधुरेशीं गप्पा मारायला देखील मला वेळ मिळेना ! माझ्याच घरांत माझी कुचंबणा झाली !

या सर्व गोष्टींचा एकदांचा निकाल लावून टाकावा, असा निश्चय करून एका रात्रीं आम्हीं दोघांनीं खूप विचार करून एक युक्ति शोधून काढली.

म्हातारा आपल्या घरीं रहायला गेल्याच्या दुसऱ्या दिवशीं दुपारच्या टपालानें मधुरेला एक पत्र आलें. मोठ्या उत्सुकतेनें तिनें तें पत्र फोडून वाचलें तों मस्तकावर आकाश कोसळून पडावें असें तिला झालें. तिची बुद्धि बधिरून गेली. पत्रांतला मजकूर आपण स्वप्नांत कां जागेपणीं वाचला हेंच तिला समजेना ! अगदीं रडूं कोसळलें तिला. तिचे हुंदके ऐकतांच शेजारचीं म्हातारा–म्हातारी चटकन् तिच्याकडे धांवलीं. तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हातारीनें विचारलें, “ उगी, उगी बरं. काय झालं मधुराबाई एवढं रडायला ? आम्हांला सांगण्यासारखं असलं तर सांगा. ”

त्यांच्या गळ्यांत हात टाकून रडत रडत मधुरा म्हणाली, “ तुम्हीं आम्हांला मुलांसारखं मानतां तर सांगायला काय हरकत आहे ?

नाहीं, सांगणारच होते तुम्हांला. अग आईग! मागल्या जन्मीं कुणाचं मीं वाईट चिंतिलं होतं, म्हणून देवानं माझ्यावर हा प्रसंग आणला!" असें म्हणत तिनें तें पत्र म्हाताऱ्याकडे टाकलें व पुन्हां हामसाहामशीं रडायला सुरवात केली.

म्हाताऱ्यानें तें पत्र घेतलें व वाचण्यास सुरवात केली.

" प्रिय मधुरा, "

" आतां बँकेच्या हिशेबांत चुकून माझ्या हातून दोनशेंची रक्कम कमी आली आहे. संध्याकाळच्या आंत वरील रक्कम भरली तरच कांहींतरी तरणोपाय आहे, नाहींतर अब्रूचे धिंडवडे झालेच. माझ्याबद्दल मला एवढेसें वाटत नाहीं, पण तुझी मूर्ति डोळ्यांपुढें येतांच रडूं कोसळतें. तेव्हां धीर धरून आपल्या शेजारच्या दामोदरपंतांना कसेंहि करून आमच्या बँकेंत असलेल्या त्यांच्या खात्यांतून दोनशें रुपये देण्याची विनंति कर. तुला तर ते आपली मुलगी मानतातच. मुलीची त्यांना कीव आली तर बचावेन, सुखरूप येऊन भेटेन. नाहींतर काय होईल तें सांगता येत नाहीं!"

तुझा

प्रभाकर.

पत्र वाचल्याबरोबर दामोदरपंतांची मुद्रा चमत्कारिक झाली. 'दोनशें रुपये द्यायचे? आणि कशाच्या आधारावर? छट्! एवढा जिव्हाळा असला म्हणून काय झालें? अन् हिशेबांत घोटाळा करणाऱ्याची दानत तरी काय चांगली असेल?' असा भाव त्यांच्या मुखावर उमटला. त्यांच्या मुखाकडे केविलवाणें पाहात मधुरेनें विचारलें, " मग काय?

देणार ना पैसे बँकेंतून काढून? घालाल ना एवढी भीक? मी आपली मुलगी! येईल कां माझी दया तुम्हांला?"

"अहो, पण रक्कम थोडी कां आहे? अन् प्रभाकरपंतांनीं हिशे-बांत असा गबाळेपणा केला तरी कसा? नीट डोकं ठेवून काम करायचं कीं नाहीं?"

"कसंन् काय याची आत्तां चर्चा पाहिजे आहे कशाला? झालं तें झालं. उपाय ताबडतोब केला तरच अब्रूची आशा आहे, नाहींतर काय होईल याची कल्पनादेखील करवत नाहीं.- मग माझ्यासाठीं—जिल तुम्ही मुलगी मानता तिच्यासाठीं—एवढं कराच. तुमच्या मुलीकरित तुम्हीं नसता का एवढा स्वार्थत्याग केला? अन् रमाबाई, तुमच्या मुलाबद्दल देखील तुम्हांला कीव येत नाहीं का? तुमच्या गोविंदानं जर असं केलं असतं, तर असा कपाळाला हात लावून बसलां असतां कां?"

"तसं नाहीं....पण—" पुढें काहींच बोलायचें न सुचल्यामुळे त्या पुन्हा कपाळाला हात लावून बसल्या.

"देणार ना पैसे?" मधुरेनें पुन्हा विचारलें. "वडिलांनींच अस तोंडघशीं पाडल्यावर आम्हीं मुलांनीं कुणीकडे बघायचं? मुलाच अपराध वडिलानीं पोटांत घालायचा नाहीं तर मग कोणीं घालायचा मीं अगदीं तुमच्या कुमुदसारखा हट्ट धरूनच बसतें. संध्याकाळच्य आंत तिकडे पैशाची पोंच झाली तरच अन्न घ्यायचं! नाहींतर मल काय करायचं मेलीला अन्न घेऊन! तिकडेच जर बरं नाहीं, तर....' आणि तिला पुन्हा जोराचा हुंदका आला.

मानलेलें नातें अंगाशीं चिकटूं लागलेलें पाहतांच म्हाताऱ्याल कसेंसेंच होऊं लागलें. कारण, आजपर्यंत त्यांनीं आईबापाच्या ऐटींं

जेथें तळ दिला होता, तेथें त्यांना एकदम ‘ नाहीं ’ असें टाकून बोल-वेना व पैसेहि देववेनात! त्यांच्या मनाचा अगदीं गोंधळ उडाला.

शेवटीं म्हाताऱ्यानें मनाशीं कांहीं निश्चय केलेला दिसला. क्षणमात्र त्याच्या सुरकुतलेल्या मुखावर आनंदाची छटा चमकून गेली. तो ममताळूपणानें म्हणाला, “घाबरूं नको बरं बाळ. तूं नी कुमुद दोन नाहींतच मुळीं. कुमुदकरितां माझ्याजवळ पैसे नसते तरी जिवाचं रान करून आणले असते. तूं आतां स्वस्थ पडून राहा, मी सारी व्यवस्था करतों!” असें म्हणून तो बायकोला म्हणाला, “ तेवढं तुझ्या पेटींत असलेलं बँकबुक दे पाहूं, चल. ”

तीं दोघें आंत गेलेलीं पाहतांच मधुरा चटकन् उठली व हळूच दाराला कान देऊन ऐकूं लागली, तों म्हातारा म्हणत होता, “ अग पैसे देतो कोण नी घेतो कोण ? तसं आपल्याला स्पष्ट म्हणतां येणार नाहीं म्हणून थाप मारून आलों. इथून बिऱ्हाडंच बदलूं म्हणजे कोण मागायला ! ह्या: ह्या..... ”

संध्याकाळीं मीं घरांत पाऊल टाकतों तों मधुरा विजयोन्मादानें ओरडली, “ अगदीं सोळा आणे काम झालं. पत्र आल्याबरोबर दोन तासांत घर रिकामं झालं. माझं डोकं आहे तें, तुमचं नाहीं.” आंत डोकावून मीं पाहिलें तों खरेंच सारें घर रिकामें होतें ! फक्त एका कोपऱ्यांत एक मांजर उंदीर धरण्याचा प्रयत्न करीत होतें.

आणि मधुरेच्या मधुर मुखावर विजयश्रीचें चांदणें फुललें होतें.

---

## निंदकाचें घर : : ३

संध्याकाळचे सात वाजलेले पहातांच हातांतील काम टाकून रमाबाई घाईघाईनें उठल्या. पेटींतील कडेल काढून झटकन् नेसल्या व सोंवळ्याचें पाणी आणण्याकरितां घागर घेऊन नळावर आल्या. आज संकष्टी चतुर्थी असल्यामुळें रात्रीं नऊ वाजतां सगळा स्वयंपाक तयार व्हावयास पाहिजे होता. म्हणून त्या नळावर जातांच आधीं पाणी भरीत असलेल्या गोदावरीबाईना अजीजीनें म्हणाल्या–" गोदावरीबाई, थोडसं मला भरूं देतां कां पाणी ? फार कांहीं नाहीं. एवढी घागर–सात वाजून गेले, अझून चुलीला पेटूं दिखील घातलं नाहीं न् नऊला येतील सगळे जेवायला म्हणून म्हणतें—"

सरलहृदयी गोदावरीबाई म्हणाल्या, " हो घ्याना. त्यांत काय एवढंसं ? मग घेईन मी. " आणि असें म्हणून त्या आपली अर्धवट भरलेली बादली बाजूला सरकावून घरीं गेल्या. बादली बाजूला सरतांच, सोंवळ्याचा ओंचा पदर नीट सांवरून रमाबाईनीं आपली घागर नळाखालीं ठेविली. इतक्यांत त्यांच्या शेजारींच रहाणाऱ्या मंजुळाबाई डुलत डुलत आपलीही बादली व घागर घेऊन आल्या व पलीकडच्या तोटीखालीं ठेवून कंबरेवर हात देऊन उभ्या राहिल्या. त्यांना पहातांच रमाबाईच्या मुखावर एक तिरस्काराची रेखा चमकून गेली. अगदीं याच वेळीं ही ब्याद इथें आली असा भाव त्यांच्या भालप्रदेशावर दृग्गोचर होत होता. वास्तविक त्यांचा ह्यांच्याशीं कोणत्याही प्रकारें नात्यागोत्याचा संबंध नसतांना, कोणतेंही कारण

नसतांना मंजुळाबाई रमाबाईचा हेवादावा करीत असत. ह्या चाळींत रमाबाईना ती जणूं भाऊबंदच झाली होती.

मंजुळाबाईच्या बादलींत पडणाऱ्या पाण्याचे तुषार चोहोंकडे उडत होते. त्यांपैकीं कांहीं आपल्या अंगावर व घागरींतील पाण्यांत पडलेले पहातांच रमाबाईच्या धार्मिक मनाला कसेंसेंच झालें. त्या चटकन् म्हणाल्या, " मंजुळाबाई, थोडा नळ बंद करतां का? माझ्या घागरीवर पाणी येतंय् तुमचं–सोवळ्याचं आहे म्हणून म्हणायचं "—

मंजुळाबाई बोलण्याची जणूं कांहीं वाटच पहात होत्या. त्या त्यांचं बोलणं संपायच्या अगोदरच उत्तरल्या, " अगोबाई, विटाळ कां होतो आहे आमचा ? महार मांग का आम्ही ? काय बाई तरी चमत्कारिक ! म्हणे जरा नळ बंद करा. एवढं सोंवळं असेल तर मी म्हणत्यें काशी रामेश्वरला कां नाहीं जाऊन रहात ? इथं—या चाळींत–आम्हां महारामांगाच्या शेजारीं राहण्यापेक्षां ? "

हा कडाका पहातांच रमाबाई एकदम सर्दच झाल्या. कशाचं कशावर नेलं ? त्या घाबरून जाऊन म्हणाल्या, " छे छे मी असं कां म्हटलं ? हें सोंवळ्याचं पाणी आहे; तुम्ही गरोदर आहांत नि गरोदर स्त्रियांचं पाणी सोंवळ्यांत चालत नाहीं म्हणून मी म्हटलं. "

" इश्श. " आधींच स्थूल असलेल्या व त्यांत दिवस भरल्यामुळें विचित्र दिसणाऱ्या शरिराला किंचित् गिरकी देत मंजुळाबाई उद्गारल्या, मी म्हणत्यें माणसानं लाज अगदीं बाजारांत विकून येऊं नये. कांहींतरी जनामनासांठीं थोडीशी शिल्लक ठेवावी. अहाहा ! काय पण धर्माचा नि सोंवळ्याचा अवतार ! कधींपासून झालांत हो

तुम्ही सोंवळ्या ?" सोंवळ्या ह्या शब्दावर त्यांनीं जोर दिला.

त्या शब्दाचा वाईट अर्थ ध्यानीं येतांच रमाबाईच्या रागाचा पारा एकदम चढला. त्या संतप्त होऊन म्हणाल्या, "कांहीं हाड आहे का तुमच्या जिभेला ? आपली उचलली जीभ लावली टाळ्याला. तुमच्या देखील कपाळावर कुंकू आहे म्हटलं. उगीच तिन्हीसांजेच्या वेळेला सुवासिनीला तुम्ही असं बोलतां, कध्धीं बरं होणार नाहीं तुमचं ! सर्वसाक्षी भगवंताला डोळे आहेत बरं. बोलतां बोलतां त्यांच्या डोळ्यांतून गंगेचा प्रवाह वाहूं लागला.

"अगोबाई ! काय पण गोगलगाय नि पोटांत पाय ! दुसऱ्यांना वाटायचं कीं, काय गरीब गाय आहे. पण हिचीं मारकीं शिंगं कुठं दिसताहेत त्यांना ? एवढ्या हळव्या आहांत तर कशाला बोलावं लोकांना आपण ? पहिल्यांदा मी कांहीं तुम्हांस बोललें होतें कां ? तरी बरं. माझ्या नांवानं तुम्ही भांडखोर म्हणून आख्या चाळींत ओरडतां, तरी उगीच भांडणाचं मूळ कशाला म्हणून स्वस्थ बसत्यें. कधीं हो मी तुमच्याशीं भांडत्यें ? अन् नवऱ्याच्या तोंडाला तोंड देण्यांत तुम्हांला माझ्याशीं भांडायला वेळ तरी कधीं मिळाला ?" शेवटचें वाक्य मंजुळाबाईनें खंवचटपणाणें उच्चारिलें. हें ऐकतांच मात्र रमाबाईचें अंग क्रोधानें नखशिखान्त कांपूं लागलें. डोळे तांबडेलाल झाले. त्या क्रोधकंपित स्वरांत चित्कारल्या, "मंजुळाबाई-मंजुळाबाई. तोंड सांभाळा बरं. आणखी कांहीं खोटं बोलाल तर तुमच्या तोंडांत किडे पडतील. कधीं रहाणार नाहीं तसं झाल्या–शिवाय. निरर्थक एकाद्याची अशी गांजणूक करूं लागलांत तर–देवारे देवा.—"

असें म्हणून त्यांनीं अर्धवट भरलेली घागर उचलली व ताडताड पाउलें टाकीत त्या आपल्या घरांत आल्या. त्यांचें तें क्रोधविवश गमन पहातांच मंजुळाबाई आणि जवळच्या घरांत आडून पहात असलेल्या बायका हीः हीः करून हंसल्या. रमाबाई पळाल्या, आपला विजय झाला असें मंजुळाबाईला वाटलें.

रमाबाईनीं घरांत येऊन घागर आपटली, व शून्य दृष्टीनें पहात त्या तिथेंच उभ्या राहिल्या. झालेल्या अपमानानें त्यांचें अंग अजूनही थरथरत होतें. नाकपुड्या जोरानें वरखालीं होत होत्या. हा अवतार पहाताच नुकतेंच ऑफिसांतून परत येऊन खुर्चीवर म्लान मुद्रा करून बसलेले नारायणराव हतबुद्धच झाले. त्यांनी भयचकिततेनें विचारलें, " काय ? काय झालं ? असा कां दिसतो आहे तुझा चेहरा ? "

बोलण्याचा प्रयत्न करूनही रागाच्या आवेगामुळें रमाबाईच्या मुखांतून शब्द फुटेना. त्या काहींच बोलत नाहींत असें पाहून नारायणरावांचें हृदय फारच व्यथित झालें. ते व्याकुलतेनें म्हणाले, " रमा, काय झालं ? अशी उभी कां तूं ? मला काहीं सांगायचं कां नाहीं ? "

अस्फुट स्वरानें रमाबाई म्हणाल्या, " ऐकायचं होईल कां माझं एक ? उद्यां दुसरी जागा बघावी—कुठं महारामांगाच्या वस्तींत मिळाली तरी चालेल, पण इथं या कचकचींत नको. जेव्हां बघावं तेव्हां ही शेजारची अवदसा मंजुळा सारखी कैदाशिणीसारखी भांडायलाच येते. भाऊबंद असती तर शोभलं तरी असतं. पण कशाचा कांहीं संबंध ? ती कोंकणस्थ नि आपण देशस्थ — "

" बा भांडायला कांहीं नात्याचा, जातीचा संबंधच असावा

लागतो वाटतं ! बरं पण ती भांडखोर आहे हें समजूनसुद्धां तूं तिच्याशीं कशाला बोलायला गेलीस ? अशा माणसापासून आपण चार हात दूर असावं. ”

“ माहीत आहे मला हें. मी का मुद्दाम तिच्याशीं भांडायला गेल्यें ? नुसतं पाणी उडतंय् म्हटलंय् तर मेलीनं केवढं रामायण केलं ! नि काय काय बोलली ! देवारे देवा ! पण बघणार ना उद्यां जागा दुसरी. मी इथं अन्न घेणार नाहीं उद्या कांहीं— ”

“ ए: असा त्रागा करूं नकोस, ” तिच्याजवळ जाऊन समजाविण्याचा सूर काढून नारायणराव म्हणाले, “ऑफिसच्या जवळ नि भाड्याच्या मानानं कमी असणारी जागा म्हणून मी मुद्दाम घेतली. आतां दुसरीकडे पटकन् अशी सोईस्कर जागा कशी मिळेल ? जरा दमानं घे. नि समजा मिळाली दुसरी जागा चांगली आणि तिथंही अशीच भांडकुदळ शेजारीण भेटली तर काय करशील ? कां पुन: अशीच पळापळी करायची ? कुठंही गेलं तरी असे भांडखोर नि निंदक शेजारी असणारच. उलट मी म्हणतों झाला तर त्यांच्या निंदेनें फायदाच होईल. तुकाराममहाराजांनीं चक्क एके ठिकाणीं म्हटलेंच आहे “ निंदकाचें घर असावें ” —

“ पुरें मेलं. आहे मला माहीत तें ” स्वयंपाक करण्याच्या तयारीला लागण्यासाठीं त्या उठतांना म्हणाल्या, “ बरं पण आज इतका उशीर कां झाला ? आपली चांगली सात वाजेपर्यंत वाट पाहिली. शेवटीं कंटाळून मी सोंवळं नेसल्यें. होय ? उशीर कां झाला आज ? नि तोंडंस उतरल्यासारखं दिसतं आहे. तापबीप कां आला आहे ?” आणि नेहमींच्या सरावाप्रमाणें त्या आपल्या पतिराजांच्या कपाळावर

हात ठेवावयास जाणार तोंच ‘ तिकडची स्वारी ’ चटकन् ओरडली, “ सोंवळ्यांत आहेस ना तूं ? अन् मला शिवतेस ? विटाळ झाला असता तर पाप लागलं असतं ना मला ? ” हें ऐकतांच त्या लाजून बाजूला झाल्या. पण आपल्या पतिराजांच्या बोलण्यांतली विषण्णता त्यांना जाणवल्याखेरीज राहिली नाहीं. काय झालं असावं बरं ह्यांना ? असे उदास नि खिन्न कां दिसताहेत आज ? माझ्याशीं बोलणंसुद्धां मनापासून होतं नाहीं. कांहीं दुखतखुपत तर नसेल ? ही कांक्षा मनांत घर करतांच त्यांच्या प्रेमळ हृदयांत चर्र झालें. त्यांनीं विचारिलें, “ डोकं कां दुखतंय् आपलं ? मग गवती चहा करून देऊं कां गरम गरम कपभर ? तेवढंच हलकं वाटेल. नि आल्याबरोबर मला कां बरं सांगितलं नाहीं ? अशी प्रकृतीची हेळसांड करायची आणि आपल्या शरीराला व माझ्या मनाला त्रास द्यायचा. ”

हे प्रेमळ शब्द श्रवण करितांच वाऱ्यानें मेघ पांगावेत तशी त्यांच्या मनांतलीं खिन्नतेचीं अभ्रें पांगलीं. ते उत्तेजित स्वरांत म्हणाले, “ ह्या—ह्या तुझ्यासारखी अत्यंत गृहकुशल नि प्रेमळ पत्नी परमेश्वरानें मला दिली ह्याबद्दल मी खरोखरच त्याचा अत्यंत ऋणी आहे. ”

“ इश्श ! असं बोलून लाजवूं नये. मी काय यःकश्चित् दासी ! जाऊं द्या तें. खरंच सांगायचं पण काय होतंय् आपल्याला तें. मघां-पासून कितीदां विचारलं मी—खोटं सांगायचं नाहीं हं ! अगदीं खर्रं खर्रं सांगायचं. माझ्या गळ्याची शपथ घालून विचारूं कां मी ? ”

“ अगदीं वेडी आहेस रमा तूं. ” किंचित् हंसून नारायणराव म्हणाले, “विषण्ण नि उदास व्हायला काय झालं आहे मला ? तुझ्याच अति चिकित्सेखोर मनाला तसं वाटत असेल. बरं पण आज तुम्हांला एक

आनंदाची बातमी कळवायची आहे. तुम्ही लौकरच वरमाय होणार आहांत, तेव्हां रुसण्याफुगण्याची–चांगली तालीम करून ठेवा."

"वरमाय?" आनंदातिरेकानें रमाबाईनें विचारलें, "म्हणजे आपल्या मधूचं लग्न ठरलं? कधीं? कुठली मुलगी? पाहिलीत कां आपण? कशी आहे?"

"संपले कां प्रश्न? कां आहेत अजून? असले तर एकदमच होऊन जाऊं द्यात म्हणजे टिपून घेतों नि सावकाश एकेका प्रश्नाचं उत्तर देतों. अगदीं प्रश्न पहिला–उत्तर पहिलं. अगदीं व्यवस्थेशीर."

"इतकं नको हो खिजवायला! माणूस आहे, थोडं उत्कंठित झालं म्हणजे विचारतं. त्यांत काय एवढं खिजवण्यासारखं? काय म्हणे टिपून घेतों. घ्या टिपून. प्रश्न पहिला, मधूचं लग्न केव्हां, कुणाशीं, कधीं ठरलं?"

"वा: पुन: एका प्रश्नांत तीन प्रश्न! बरं नीटच सांगतों तुला. आमचे रामभाऊ हेडक्लार्क माहीत आहेत ना तुला?"

"म्हणजे महालक्ष्मीच्या दिवशीं संध्याकाळीं फराळाला आले होते ते? पांढरा रुमाल घातलेले होते तेच ना?" रामभाऊ कोण, तें आठवीत रमाबाईनीं विचारिलें.

"हो हो तेच, त्यांची मेहुणी आहे लग्नाची—"

"रामभाऊसारख्यांशीं कां आपला संबंध जुळणार?"

एवढ्या मोठ्या मनुष्याशीं आपली सोयरीक जमणार या आनंदांत त्यांनीं विचारलें. रामभाऊ म्हणजे लहान कां माणूस आहे? एक लाखाचा नुसता बंगलाच आहे, त्याशिवाय रोख बँकेंत आहेत ते वेगळेच. बायकोच्या अंगावरचे दागिने वेगळेच, शिवाय मोठा थोरला

मळा आहे. एवढा श्रीमंत माणूस आपला व्याही होणार? हा: केवढें आपलें भाग्य! रमाबाईच्या मनांत आनंदाचें तुफान झालें.

अत्यानंदानें फुललेल्या पत्नीच्या लालसर मुखाकडे निर्विकार मुद्रेनें पहात नारायणराव म्हणाले, " उद्यां दुपारीं ती मंडळी येणार आहेत तेव्हां तयारी असूं द्या. "

" तयारी म्हणजे काय एक मुलीच्या हातांत द्यायचा खाऊचा पुडाच ना? हात्तिच्या आत्तां मधूच्या हातींच आणून ठेवत्यें. पण बाई आपल्या मधूचं लग्न ठरलं म्हणून आपल्याला नाहीं आनंद होत?"

खिन्नपणानें हंसून उडवाउडवी करीत नारायणराव उत्तरले, "छे. तुझं आपलं काहींतरीच! आनंद न व्हायला काय झालं? मला तुझ्यापेक्षांही आनंद झाला आहे. "

आधणांत भात वैरतां वैरतां रमाबाई म्हणाल्या, " आपल्या वर्तनाचा मला उलगडाच होत नाहीं. वरून सांगतां खूप आनंद होतो आहे म्हणून पण मनावर कसलें तरी दडपण पडल्याप्रमाणें गंभीर नि उदास चेहेरा करून बोलतां; काय समजूं मी? "

" काय वेडी आहेस ग. नसत्या शंका काढते आहेस. बरं लौकर करा वरमाई स्वयंपाक. पोराच्या लग्नाच्या आनंदांत आम्हांला जेवायचं आहे हें विसरूं नका हं. चालूं द्या हात पोळ्यावर झटपट. कावळे ओरडूं लागले आहेत पोटांत. अजून पूजा नि जेवण. हायरे देवा—उद्यां दुपारीं येतील ती मंडळी. बहुतकरून रामभाऊंचा मेहुणा, बायको नि मुलगी तिघेच येतील. आजच त्यांनीं तसं सांगितलं आहे. मधूला सांगून ठेव दुपारी कुठं जाऊं नकोस म्हणून. मीही रजा काढून ठेविली आहे. होऊंद्या पाहाणं" बोलतां बोलतां ते खिन्नपणानें हंसले.

रमाबाई पुन्हां चमकल्या. पोराच्या लग्नाचा वेळेला हे असें कां करताहेत हेंच त्यांना समजेना. भ्रांतचित्त होऊन त्या स्वयंपाक करूं लागल्या. नारायणराव शून्य दृष्टीनें कुठें तरी पहात बसले.

*     *     *

सकाळपासूनच रमाबाईनीं घर कसें शोभिवंत नि लख्ख करून ठेवलं होतं. भावी सूनबाईनीं निदान घराच्या स्वच्छपणाला नि नीटनेटकेपणाला भाळून जाऊन या घरांतच पडण्याचा दैवाला नवस करावा, असें त्यांना वाटलें. मधूनें आपल्या मित्रमंडळीचा ताफा अकरा वाजतांच घरांत आणून बसविला होता. त्या ताफ्यापैकीं कांहीं मंडळी मधूचें वडील आतल्या घरांत जेव्हां जेव्हां जात तेव्हां तेव्हां हळूंच 'बायस्कोप' सिगारेटचा मधुर समाचार घेत व तोंडांतून न दिसेल अशा बारीक रीतीनें धूर सोडीत व पुनः समाचार घेत. नारायणराव मात्र अस्वस्थ मनानें आतबाहेर येरझारा करीत होते. जणूं कांहीं हें लग्न म्हणजे एक धोंडच आहे असें त्यांना वाटत असावें.

शेजारच्या मंजुळाबाईना हा 'टेलिफोन' कालच मिळाला होता.

त्याही पतिराज कामावर गेल्याबरोबर घरांतलें काम जेथल्या तेथें टाकून 'कोणमंडळी आहेत बाई?' अशी मनाशीं विचारणा करीत मधून मधून मंडळी आली कीं नाहीं हें पाहण्यासाठीं रमाबाईच्या घराकडे वांकून वांकून पहात होत्या. त्या पाहण्यांतही एक तऱ्हेचा कुत्सित नि खुनशी स्वभाव प्रतीत होत होता. आपल्याशीं भांडणाऱ्या बाईचा आपल्यासमोर 'वरमाय' म्हणून तोरा मिरवूं द्यायचा? मग आपली प्रतिष्ठा ती काय राहिली? ही चाळ सोडून जा. मग

दुसरीकडे पोराचें लग्न कर नाहीं तर मुंज कर. पण माझा चार लोकांत आपमान करणाऱ्या टवळीचा असला बडेजाव ? छे, मी तर मुळींच सहन करणार नाहीं. मंजुळाबाईच्या मानसमंदिरांत असल्या विचारांचा फडफडाट होत असतांना त्यांच्या डोळ्यांला दोन नवी लुगडी व एक पगडी जिन्यातून हलकेच वर येत असलेली दिसली. तत्क्षणीं त्यांचे डोळे विलक्षण तेजानें चमकलें. आपला स्थूल देह जेवढ्या चपळाईनें ढकलतां येईल तितक्या चपळाईनें ढकलून त्या बाहेर आल्या व जिन्यातच त्या मंडळीला गांठून जसं कांहीं 'रिसेप्शन' च करायला आलों आहोंत असा भाव आणून त्या मंजुळ स्वरांत म्हणाल्या, "यावं-यावं मंडळी." आणि असें म्हणतच त्या त्यांना आपल्या घरांत घेऊन आल्या.

हें दुसरेंच घर दिसतांच पगडीधरानीं शंकित मनानें विचारलें, "नारायणरावाचें तें घर आहे ना ? मग इथं ?"

तटकन् मंजुळाबाई उद्गारल्या, "त्यांचा आमचा फार ऋणानुबंध आहे. म्हणून मुलीला मी पहिल्यांदा पाहण्याची संधि साधत आहे. बसा हं, फक्त पांचच मिनिटं एवढा चहा घ्या नि मग जा. बसा हो अशा खालीं पाटावर. मुली, बैस हो अशी."

सर्वजण स्थानापन्न झाल्यावर आपण मुलीचे कोण ह्याची पगडीधरांनीं व पोक्त बाईनें ओळख करून दिली. त्यावर हंसरा चेहरा करून मंजुळाबाईनीं चहाला आधण टाकलें व हलका स्वर काढून म्हटलें, "आपण मुलीचे भाऊ नि बहीणच आहांत, तेव्हां आपल्याला कांहीं हिताच्या गोष्टी सांगितल्या तर राग नाहींना येणार ?" त्यावर "छे छे, राग कसला." असें भावाबहिणीचें उत्तर येतांच

नीट बसून मंजुळाबाईनें आपलें भाषण चालू केलें. " हिताचं म्हणजे असं कीं, आमच्या मधूचं स्थळ आपल्याला कोणी दाखविलं? आमचीं माणसं असलीं तरी उगीच कुणाच्या जन्माचं नुकसान व्हावं असं मला वाटत नाहीं. आणि या अप्सरेसारख्या असलेल्या मुलीकडे पाहून तर मन विशेषच खिन्न होतं." हें भाषण श्रवण करितांच भाऊबहीण चकित होऊन एकमेकांकडे पाहूं लागले. " ही काय भानगड ?" अशा नजरेनें एकमेकांनीं एकमेकांकडे पाहिलें.

त्यांच्या विस्मयाकुलतेकडे बिलकुल लक्ष न देतां त्या पुढें ह्मणाल्या, " तसं पाहिलं तर मधूचं लग्न कोणत्या गोष्टी पाहून व्हावं हेंच मला समजत नाहीं. रानात शेत नाहीं गांवात असलेलं घर परवां अशाच कांही भानगडी करून बोळपटून टाकलं. अहो, आम्हीं त्यांच्या गांवचे. त्याच्या घराला लागून घर आहे आमचं म्हणून तर साऱ्या गोष्टी आह्माला माहीत. एवढंच काय पण पोरगं तर असं आहे कीं, घराच्या वांटणीच्या वेळीं चुलत्याला मारल्याच्या आरोपावरून चार महिने तुरुंगांत गेलं होतं."

" काय तुरंगांत ?" पगडीधरांनीं किंचाळून विचारलें.

" हो हो तुरुंगांत नि त्यांच्या आईसाहेब असा कडक लक्ष्मीचा अवतार आहे ह्मणतां. परवां तर नारायणराव त्यांच्या जाचानं त्रासून विष प्यायला तयार झाले हो. आणि अशा विस्तवांत ही फुलासारखी नाजूक पोर."

" कांहींतरीच बोलूं नका तुम्हीं." पोक्त बाईंना हें खरें न वाटल्यामुळें त्या ह्मणाल्या."

मला नाहीं हें खरं वाटंत. अन् तुह्मी त्यांच्या ऋणानुबंधी ह्मण-

बतां आणि असें उलटं सांगतां ? ”

आपला बाण फुकट जाणार हें पाहातांच मानभावीपणानें मंजुळा-बाई ह्मणाल्या, “ जा बाई मला काय करायचं आहे ? तुह्मां तिऱ्हाइतांना ही आंतली भानगड काय माहीत ? जाईसारखी कोमल पोर जाचानं कोमेजून जाईल म्हणून वाईट वाटून मी मुद्दाम सांगितलं. जा बापडे, माझं काय त्यांत जातंय् ? लग्न मोडण्यासारखं दुसरं पाप नाहीं म्हणतात, पण एका पोरीच्या जन्माचं वाटोळं झालेलं पाहाण्यापेक्षां त्या पापाचे धनी झालें तरी परवडेल म्हणून मी आपलं सांगितलं. आतां तुह्मी जाणे नि ते जाणे. पण लग्न झाल्यानंतर पोरीच्या डोळ्यांतून पाणी गळूं लागलं म्हणजे मग बरीक वाईट वाटून घेऊं नका एवढें सांगत्यें. ”

हें निश्चयपूर्वक भाषण ऐकतांच पोक्त बाईचाही विश्वास डळमळूं लागला. तिचें मन म्हणालें, “कुणास ठाऊक काय आहे तें? सध्यांच्या काळांत कुणाकुणाचा म्हणून विश्वास देतां येत नाहीं. परवांच नाहीं कां जोशीणबाईच्या मुलीचा गळा श्रीमंत मुलगा म्हणून दाखवून आचाऱ्याच्या पदरीं बांधून कापला ? मग ह्या स्थळाचा तरी काय नेम ? ”

त्या विचारांत गढलेल्या दिसतांच मंजुळाबाईच्या चेहेऱ्यावर एक तऱ्हेचें विजयश्रीचें तेज झळकूं लागले. आणि त्या आनंदांतच त्यांनीं चहाचे तीन कप भरले व तिघांच्या पुढ्यांत ठेवून त्या म्हणाल्या, “ हं घ्या हा चहा—लौकर घ्या, नाहींतर निवून जाईल. ”

पगडीधरांनीं कप आपल्याकडे ओढीत म्हटलें, “ मग काय ? आपण म्हणतां हें सगळं खरं आहे ना ? तसं असेल तर नारायणराव

म्हणजे एक बदमाष मनुष्य असला पाहिजे. रामभाऊला काय थापा मारिल्या. घर आहे न् मळा आहे, यंव न् त्यंव–छे छे, आधीं तुमची गांठ पडली म्हणून एवढा खुलासा झाला नि त्यांचीं अंडीं-पिल्लीं कळलीं, नाहींतर आम्हांस कोण सांगणार होतं ? ''

'' एवढं जरी असतं तरी मी बोललें नसत्यें. मधु म्हणजे एक उपद्व्यापी बाळ आहे. त्याचा एक किळसवाणा उद्योग पाहून मात्र मला ह्या पोरीची कींव आली. अहो, आता काय सागावं नि कसं सांगावं हेंच मला समजत नाहीं. मंजुळाबाई हलका स्वर काढीत म्हणाल्या, '' त्यानं कायशीशी एक मराठ्याची बाई.... ''

'' मग काय आटपलंच. '' ताडदिशीं पगडीधर उठून म्हणाले, '' आतां सरळ घरीं चला. कांहीं दाखवायची जरूरी नाहीं. यमुताई, आपलं नशीब शिकंदर म्हणून ह्या बाई भेटल्या. ''

यमुताई दुजोरा देत म्हणल्या, '' अगदीं देवासारख्या भेटल्या ह्या. नाहींतर आमच्या मालूचं नशीब नव्हतं ग बाई धड ! बरं आहे चला. मंजुळाबाई, तुमचे हे उपकार आम्ही कध्धीं विसरणार नाहीं बरं. '' असें म्हणून सगळेजण नारायणरावांच्या घराकडे ढुंकूनहि न पाहतां आल्या वाटेनें तडक परत गेले.

मंजुळाबाईनीं रमाबाईच्या घराकडे पाहून एक तुच्छतेचें हास्य केलें.

एक वाजायला आला तरी अजून मंडळी कशी येत नाहींत याबद्दल सार्‍यानांच आश्चर्य वाटूं लागलें. रमाबाईंना वाटलें, कदाचित् कसली अनपेक्षित अडचण तर आली नसेल ? पण तसं कांहीं असतं तर कुणीतरी येऊन कळविलं नसतं कां ? असा जीव टांगून ठेवण्यांत काय अर्थ आहे ? कां आज मुलीला दाखवायला न्यायचें आहे ह्याची

त्यांना आठवणच झाली नाहीं ? काय झालं असावं ?

सगळ्यांची अशी विचारांची चुळबुळ चालली होती.

शेवटीं मधूच्या एका दोस्ताला राहवेना. त्यानें विचारिलें, " मी जाऊन पाहून येऊं कां ? कुठंशी आहे त्याचं घर ? आतां सायकल-वरून जाऊन येतों. अकराची वेळ ठरवली आणि एक वाजला तरी पत्ता नाहीं. माणसं आहेत कां हैवान आहेत ? मग जाऊं कां ? "

" हो पाहून या. येताहेत कीं नाहींत हें कळलं म्हणजे तेवढंच बरं. माणसांना उगीच ताटकळत बसवायचं म्हणजे काय ? आता यायचं नसलं जमत तर कळवा म्हणावं केव्हां येणार नक्की तें. " रमाबाई बाट पाहून कंटाळून म्हणाल्या.

" बरं तर पाहून या " जड स्वरानें नारायणराव म्हणाले, " काय म्हणताहेत ते ! " मुलीच्या घरीं जाण्यासाठीं म्हणून मधूचा दोस्त सायकल बाहेर काढून रस्त्यावर आला तोंच त्याला कोणीसें विचारलें, " नारायणराव इथंच रहातात कां ? "

" हो इथंच रहातात. कां ? "

" ही चिठ्ठी दिली आहे रामभाऊंनीं त्यांना द्यायला, देतां कां ? "

" हो हो अवश्य " असें म्हणून त्या माणसाच्या हातांतील चिठ्ठी घेऊन तो परत घरांत आला. त्याला इतक्यांत परत आलेला पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. मधूनें तर विस्मयानें विचारलें, " आँ ! इतक्यांत परत आलास ? कां गेलाच नाहींस ? "

" नाहीं गेलों. ही चिट्ठीच आली एका माणसाबरोबर त्यांची. मग कशाला जाऊं ? "

नारायणरावांच्या हातांत चिठ्ठी देत मधूचा दोस्त म्हणाला.

नारायणराव फोडीत असलेल्या चिठ्ठीकडे सर्वजण आतुरतेनें पहात होते.

नारायणरावांनीं चिठ्ठी वाचली मात्र. त्यांच्या डोळ्यांत एकदम आनंदाचा सागर उसळला. कालपासून खिन्न झालेल्या मुखाभोंवतीं आनंदाचें वलय फिरूं लागलें. ते त्या आनंदाच्या भरांत ओरडले, " ह्यः देवानं केवढी खैर केली ! मधू–मध्या, तुझं लग्न मोडलं नि माझ्या जिवावरचं ओझं निघालं. "

त्यांच्या त्या 'अवतारा'कडे पहात सर्वजण–विशेषतः रमाबाई तर दिङ्मूढ होऊन गेल्या. हे असें काय करताहेत ? ह्याना काय वेड तर लागलें नसेल असा फुसट विचार त्यांच्या मनांत डोकावतांच त्या घाबरून ह्मणाल्या, " वाचावं त्यांनीं काय लिहिलंय् तें; माझा तर बाई जीव उडून गेला आहे. "

" पण माझा अगदीं थाऱ्यावर आला आहे. हं मधू, ही चिठ्ठी मोठ्यानें " नारायणरावांनीं चिठ्ठी मधूकडे फेंकली. मधू वाचूं लागला. सर्व मंडळी आतुरतेनें ऐकूं लागली.

" नारायणराव यासः—

आपल्याकडे गेलेली मंडळी आतांच परत आली. परंतु सुदैवानें आपलें दर्शन होण्याऐवजीं आपल्या शेजारीं रहाणाऱ्या बाईनीं आम्हांस आपणासंबंधींची माहीत नसलेली विशेष महत्त्वाची माहिती – विशेषतः आपल्या दिवट्या पुत्राच्या तुरुंगवासाची व आपल्या पत्नीच्या तोंडाळपणाची हकीकत ऐकून आम्ही गारच झालों आहोंत. आपल्या गांवीं स्वतःचें घर असल्याचें खोटेंच सांगून आमच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याची आपण खूप तयारी केली होती.

परंतु ईश्वरकृपेनें आपल्या शेजारच्या मंजुळाबाई ह्या बाईच्या तोंडून आपलीं सर्व कुलंगडीं वेळींच आम्हांस समजलीं; त्याबद्दल आम्ही परमेश्वराचे व त्या बाईचे आभारी आहोंत. आतां लग्न जुळणें शक्य नाहीं, हें सांगणें नकोच. आपणास मिळणारें पंचवीस रुपयांचें प्रमोशनहि त्याबरोबरच पाण्यांत गेलें, हें आपण ताडलें असेलच. तरी आपण अशा खोट्यानाट्या थापा मारून दुसऱ्या कोणत्यातरी मुलीचा गळा कापावा अशी विनंति आहे. कळावें.

आपला,

रामभाऊ हेडक्लार्क, "

" अग चाडाळणी " दांतओंठ खाऊन रमाबाई कडाडल्या, " असं खोटंनाटं सांगून माझ्या पोराचं लग्न मोडून टाकतेस काय ? देव तुझं कधीं बरं करणार नाहीं. तरी मी आपल्याला सांगत होत्यें कीं, असल्या शेजाऱ्याच्या सावलीला नको. कुठं तरी—मसणांत जाऊन राहूं ! कसा साता जन्मींचा दावा असल्याप्रमाणं मेलीनं वैर मांडलं आहे. एवढ्या श्रीमंतांची मुलगी चांगली घर चालून आली होती; पण टवळीनं परत दवडली—नि आपणहि लग्न मोडल्याचा मुलखा-वेगळा आनंद दर्शवितां ! आपल्या मनांत पोराचं लग्न होऊं नये असं का आहे ? "

नारायणराव किंचित् हंसून म्हणाले, " अग, तुरुंगांत गेलेल्या कोणत्या पोराबद्दल त्याच्या बापाला आनंद—हौस वाटेल ? मंजुळा-बाईनीं पाहिलं आहे त्याला तुरुंगांत जातांना— "

" पुरें पुरें ऐकवत नाहीं तसलं बोलणं. ती मेली काय वाटेल तें

बडबडेल. पण आपण त्याचा कशाला उच्चार करा? पण खरंच सांगयचं, आपल्या मनांत नव्हतं त्याचं लग्न करायचं तर हा मुलगी पाहण्याचा फार्स तरी कशाला केला? नि त्यांतली ती प्रमोशन कां फ्रमोशन काय भानगड आहे ती?"

"सांगतों—सारें सांगतों, मंडळी, नीट ऐका. आमचे ऑफिसां-तील रामभाऊ हेडक्लार्क माहीतच आहेत तुम्हांला. त्यांची मेहुणी मधूला करून घेण्याबद्दल आज कित्येक दिवस त्याचं टुमणं माझ्या मागं लागलं होतं. परवां तर त्यानीं स्पष्टच सांगितलें कीं, ह्या महिन्यात लग्न उरकून टाकलेंच पाहिजे. मी आपल्याला हुंड्याबद्दल रोख रक्कम १००० रुपये देतोंच; शिवाय तुमच्या पगारांतही शिफारस करून पंचवीस रुपये वाढवितों; पण लग्न मात्र ताबडतोब उरकून टाकलें पाहिजे."

"बा: मग वाईट काय होतं त्यात?" रमाबाई आनंदून म्हणाल्या, "एवढी त्यात घाबरण्यासारखी कोणती गोष्ट होती?"

"अग, पण जरा सबुरीनें घे. आमच्या रामभाऊसारखा जिद्द माणूस एका कवडीकरतां प्राण देईल अशा ख्यातीचा. तो मेहुणी-करिता एवढा स्वार्थत्याग करायला कसा तयार झाला ह्याचंच मला मोठं आश्चर्य वाटलं. मन मोठं बुचकळ्यांत पडलं. मुलगी तरी कशी आहे, हें पाहण्याकरितां त्यांच्या घरीं गेलों; तों बावीस एक वर्षाची तोंडावर देवीचे वण असलेली काळी मुलगी त्यांनीं ही मेहुणी असं म्हणून पुढं केली. मी तिच्या तोंडाकडे पहातांच एकदम चमकलों. तिच्या डाव्या डोळ्यांत फूल होतं नि—"

"काय होतं आणखी" सर्वांनीं कुतूहलानें विचारिलें.

तिचे दोन्ही ओंठ कोडानें भरले होते. ”

“ इश्श ग बाई, ” अंगावर शहारे आल्याप्रमाणें अंग थरथरवून रमाबाई म्हणाल्या, “ असली ओंगळ मुलगी कोण करून घेईल ? साफ सांगायचं होतं कीं, मुलगी तिळमात्र पसंत नाहीं म्हणून. ”

“ बायकांना राजकारण समजत नाहीं म्हणतात तें एवढ्यासाठींच. ताडकन् मीं सांगितलं असतं कीं लग्न कर्तव्य नाहीं म्हणून, तर संतापून जाऊन हेडक्लार्कनें कामांत कांहीं खुसपट काढून माझ्या नौकरीवर गदा आणण्याचा प्रयत्न केला असता. तसा तो फार बेरकी आहे. सध्यांच्या बेकारीच्या काळांत थोडं नमूनच असावं लागतं. म्हणून अर्धवट संमति देऊन मी ‘ अशुभस्य कालहरणम् ’ म्हणतात ना त्याप्रमाणें घरच्या माणसांना अगोदर मुलगी दाखवतों मग काय तो तिथिनिश्चय करूं, असें गुळमुळीत उत्तर देऊन ठेविलें. तोंपर्यंत कांहीं तोड सांपडते कां तें पहात होतों. कालपासून मी ह्याच विवंचनेंत होतों तों आयतीच आपल्या निंदक मंजुळाबाईनें ती ब्याद परस्पर टाळली. याबद्दल आपण तिचे खरोखरच आभार मानले पाहिजेत. कां खरं ना रमाबाई, कां हवीय् तसली सून ? कायरे बोवा मधु, हवीय् कां तुला तसली बायको ? ” आईकडे तिरप्या नजरेनें पहात मधु म्हणाला, “ दादा, आईला आवडली असेल तर एका पायावर माझी तयारी आहे. आईच्या एकाही शब्दाबाहेर मी नाहीं. ”

क्रुत्रिम कोपानें रमाबाई म्हणाल्या, “ चल लबाड कुठला ”

---

## आगगाडींतील चोर : : ४

विश्राम आज बहोत खुषींत होता. नुकत्याच पाहिलेल्या एकाद्या चित्रपटांतील भाषणाची आणि गाण्याची तो स्वतःशींच पुनरावृत्ति करूं लागला म्हणजे स्वारी अतिशय खुषींत आहे, असें खुशाल समजावें. ऑफिस सुटतांच त्या आनंदाच्या तंद्रींत तो घरीं इतक्या लौकर आला कीं, त्याचा त्यालासुद्धां जरासा विस्मयच वाटला. दार उघडून स्टोव्हवर चहाचें आधण टाकून चहासाखरेचे डबे आणण्यासाठीं तो उठला. उठताच काल पाहिलेल्या 'देवदास' बोलपटांतील देवदासची नक्कल करीत बोलूं लागला, "हां मा है, बाप है! भाई है! पार्वती है! और एक चंद्रा भी है!" आणि उजव्या हातानें साखरेचा डबा खालीं घेत व थोडेसें त्या डब्यालाच देवदासमधील पार्वती समजून आवेशानें तो पुढें म्हणाला, "देख पार्वती! जादा खूबसूरती अच्छा नही, इस्से इन्सान मगर होता है, चांदके सेरेपर जैसा डाग है वैसा तुझेहि"— बोलता बोलतां तो इतका आवेशांत आला कीं, डब्याचें झांकण निघून खालीं साखर पडूं लागली, हें पाहतांच तो थोडासा विरमला व आवेश कमी करून 'दुखके दिनमे' आपल्या मधुर (!) आवाजानें गात गात चहा करूं लागला. पुनः त्यास काय वाटलें कुणास ठाऊक! तो उठला व एक कपभर पाण्यांत पुनः एक कपभर पाणी टाकून पुटपुटला, " बस्स्! आज जिवाचा नाताळ करायचा. आणखी चार दिवस सुट्टी म्हणजे काय कमी आहे? आज सुट्टीप्रीत्यर्थ एक कप जास्त चहा प्यायचा. चार दिवस सुट्टी! कोठें बरें घालवावी हो? अगदीं या चार दिवसांतील पळन् पळ

मजेंत गेला पाहिजे. कामाची आठवण होतां कामा नये. सोलापुरी इंदूकडे जावें का दौंडला मनोहरकडे जावें ? मनोहर ओ माय फ्रेंड! किती दिवसांत बेट्यां आपली गाठ पडली नाहीं ? चार वर्षांपूर्वी बायकोला मुंबई दाखवायला आला होतास त्यानंतर तुझी प्रत्यक्ष अशी भेटच झाली नाहीं. डरो मत् अभी आता हैं हम् जाऊं या त्याच्याकडे. इंदु आज नाहीं उद्यां इकडेच येणार. मनोहरकडे मात्र पुन्हां जायला मिळणार नाहीं." बोलत बोलतच दोन कप चहा करून त्यानें ते दोन्ही सुटीच्या नांवानें आपल्या घशाखालीं ओतले.

लवंगेवरचें बोंड दातानें फोडून फेंकून देऊन ती चावीत तो नुकत्याच आलेल्या वृत्तपत्रावरून नजर फिरवीत व दौंडला कोणच्या गाडीनें जावें या विचारात इकडे तिकडे फिरूं लागला, तोंच पोस्टमननें त्याच्या नांवाचें टपाल टाकलें. हातांतलें वृत्तपत्र फेकून देऊन उत्सुकतेनें 'कुणाचें असावें बुवा हें पत्र' अशा जिज्ञासेनें कपाळावरची आंठी चढवीत त्यानें तें पत्र हातांत घेतलें. पाकिटाच्या कोंपऱ्यांत हातानें थोडेसें फाडून तेथें बोट घालून सबंध पाकीट फोडून तो तें पत्र वाचूं लागला.

॥ श्री ॥

सोलापूर
नवी पेठ
५ । ९ । १९३६

चि. रा. विश्रामपंत यांसी अनेक आशीर्वाद उपरि विशेषः—

आज मुद्दाम पत्र लिहिण्यास कारण कीं, चि. सौ. इंदू हिच्या पुण्याच्या एका मैत्रिणीनें आपल्या सर्व मैत्रिणींचें एक स्नेहसंमेलन

भरविण्याचें ठरविलें आहे व त्याप्रमाणें चि. सौ. इंदूला तिकडे येण्याबद्दल मोठ्या आग्रहाचें पत्र आलें आहे. तिकडे पाठविण्याच्या अगोदर आपली आम्ही तिला पाठविण्याबद्दल परवानगी घेत आहोंत. तिला तिकडे पाठवावें असें आपल्या मनांत असेल तर तावडतोब उलट तार द्यावी म्हणजे फुकट वेळ जाणार नाहीं. आपल्याला तें आवडत नसेल तर तसेंहि कळवावें. आपल्या शब्दाबाहेर आम्ही नाहींत. चि. सौ. इंदूची मात्र तिकडे जाण्याची फार इच्छा आहे, हें मात्र आपणास मुद्दाम कळवीत आहें. आपण तेथें एकटेच आहांत; तरी जपून राहावें. कळावें हा आशीर्वाद.

आपला,

श्रीधरपंत.

पत्र वाचून होतांच किंचित् हंसून विश्रामनें तें पत्र खिशांत कोंबलें. तो मनाशींच म्हणूं लागला, "बाईसाहेबांना मैत्रिणीकडे जायचं आहे एकूण—अच्छा 'होगु.' माझी का छाती आहे तिला मधेंच अडवायची? अन् मी नाहीं म्हणून सांगितलें तर या मुंबईत सोलापूर कधींच येणार नाहीं. ती यायचीच नाही मुळीं. आलीच तर डेक्कन क्वीनपेक्षांहि जास्त अशा रागाच्या झटक्यानें येऊन माझी केंविलवाणी स्थिति करून टाकील. त्यापेक्षां 'माझी संमति आहे. खुशाल आनंदानें जाऊं द्या' अशी तार ठोकून बारा आणे गेले तरी पत्करतील. पण एवढें तरी बरें झालें. या सुटींत मी तिकडे गेलों नसतों तर ती खास रागावली असती. आतां तें तरी एक चुकलें. आतां यापुढें एकच दौंड-मनोहर—चार दिवस सुट्टी—मज्जा!!!"

या आनंदाच्या कैफांतच तो उठला. कोट टोपी घालून पोष्टांत जाऊन ‘ इंदूच्या जाण्याला माझी कांहीं हरकत नाहीं ’ या मजकुराची तार करून तो परत आला. येतांना दोस्ताला भेट वस्तु देण्यासाठीं म्हणून दोस्तमजुकुराला एक भारी किंमतीचें फाउंटनपेन, त्याच्या बायकोला एक जरीचा अंजिरी खण व लहानग्या पोरीला कांहीं खेळणी व चॉकोलेटच्या वड्या असा सरंजाम घेऊन आला. आणलेल्या चॉकोलेटच्या वड्यांपैकीं एक तोंडांत टाकून चघळत तो बांधाबांधी करूं लागला.

रात्रीची मेल सुटायला बरोबर पांचच मिनिटें कमी असतांना विश्राम हातात बॅग घेऊन धांवत धावत स्टेशनवर आला व समोर जो डबा दिसला त्यांतच लगबग करून आंतल्या माणसांच्या निषेधाला न जुमानतां चढला. दाराजवळील जागेवर तो संथपणें उभा राहिला. कुठें जागा आहे का तें पाहूं लागला. रात्रीची वेळ असल्यामुळें जो तो थोडथोडे पाय सारून डुलकी घेण्याचा प्रयत्न करीत होता. डावीकडचा सबंध बाक एका कच्छी घराण्यानें व्यापला होता. उजवीकडे दोन मराठ्याच्या बाया व त्यांचे ‘ कारभारी ’ आपलीं गांठोडीं कोणी तरी पळवितील या धास्तीनें आपल्या मांडीवर घट्ट धरून बसलीं होतीं. त्यांचे अलीकडे एक फॅशनेबल तरुण आपलें बेडिंग बाकावरच ठेवून त्याला टेंकून पिवळा हत्ती ओढीत होता. चौथ्या बाकावर चार तरुण स्त्रिया त्याच स्टेशनवर चढलेल्या असल्यामुळें आपलें सामान नीट आवरून ठेवून आपली बसण्याची जागा जास्त ऐसपैस करीत होत्या. त्याच बाकाच्या टोंकाला थोडीशी जागा दिसल्यावर विश्राम चटकन् तेथें बसला व चपटी बॅग वर बर्थवर

ठेवण्यासाठीं पुनः उठून बाकावर चढून ती बॅग वर ठेवूं लागला. ती वर ठेवतांच आपल्यासारखीच दुसरी एक बॅग तेथें पाहून त्याला जरासा विस्मय वाटला. अगदीं त्याच्या बॅगसारखी वरची दुसरी बॅग होती. ती कुतूहलानें जराशी पाहून तो खालीं उतरला व दौंडला मनोहरच्या घरीं गेल्याबरोबर तो अकस्मात् कसा चकीत होईल त्या स्थितीची कल्पना करून तो जिवाची करमणूक करूं लागला.

" इश्श प्रभे, हें ग काय तुझं असं ? आम्हीं पुस्तक वाचायला काढलं कीं, तुला तें बघवत नाहीं वाटतं ! " कोपऱ्यांतून असा आवाज आल्याबरोबर विश्रामाचें चटकन् लक्ष तिकडे वेधलें. फिक्या केशरी रंगाचें पातळ हातांत ' दिव्यचक्षु ' कादंबरी धरून बोलत होतें.

" तर तर मोठी वाचणारी आलीय्. गाडींत मजेमजेनं गप्पा मारायच्या का असं एकालकोंडं होऊन वाचत बसायचं ? घर नाहीं वाटतं वाचायला ? मी अगदीं प्रतिज्ञाच करतें हवी तर सबंध प्रवासांत तूं एक पान वाचावं मीं तूं काय म्हणशील तो दंड देईन. " प्रभावती म्हणाली.

केशरी पातळ अर्थात् छाया म्हणाली, " आणि मीहि प्रतिज्ञाच करत्यें कीं, अर्धी कादंबरी संपविल्याशिवाय कुणाशीं बोलल्यें तर हव्वी ती शिक्षा सोसून घेईन. मला नाहीं बाई असला मार्शल लॉ खपायचा ! "

The third मधेंच म्हणाली, " काय लहान मुलांसारखं भांडायला लागलां ग तुम्ही ? प्रभा, नाहीं तरी तुझा आचरटपणाच जास्त असतो. वाचेना बिचारी ती पुस्तक ! "

तोंच प्रभा उत्तरली ! " पुरे हो आजीबाई, आपलं पुराण. काय

म्हणे लहान मुलासारखं. साठ वर्षांच्या लुकड्या आजीबाईच झालों आहोंत नाहीं आपण ? मनुष्याच्या अंगांत कांहीं तरी ' स्पोर्टिंग स्पिरिट ' पाहिजे. लागलीच चिडलं म्हणजे झालं वाटतं ! त्या दृष्टीनं आपल्या कमलचा स्वभाव भारी पसंत आहे मला. "

" पसंत आहे ना बरं झालं "—छाया मध्येंच खेंकसली.

त्यांच्या समेटाचा प्रयत्न करण्यासाठीं इतका वेळ श्रोत्याचें काम करणारी वासंती बोलूं लागली, " किती वेड्या आहांत ग तुम्ही दोघी. मूर्ख म्हणाल्यें तर रागवाल. पण अगदीं मूर्खासारखं वागतां बघा. स्थळ कोणतं ? काळ कोणता ? कांहीं पोंच ? बरं हो; मी तुम्हांला एक कोडंच घालतें असं म्हणाना ' कमलला द्यायला कोणी काय काय आणलं आहे हें कोण बरोबर ओळखेल त्याला आपल्या ह्या ' बॅच ' चा पुढारी म्हणून कबूल करायचं. ओळखा पाहूं मीं काय आणलं आहे तें ? "

हें सर्व संभाषण विश्राम पडल्या पडल्या ऐकत होता व मधूनच तिरपी नजर टाकून त्यांचा आविर्भाव पहात होता. ही सर्व मंडळी कुठं तरी आपल्या मैत्रिणीच्या लग्नाला चालली असावी असा त्यानें कयास केला. गाडीतील फॅशनेबल तरुणानें पांच सिगारेटस् जाळून फस्त केल्या होत्या. पलीकडच्या कच्छी घराण्यानें आपल्या लहान मुलाच्या करमणुकीकरितां फोनो लावण्याचा चंग बांधला होता व त्या मराठ्याच्या बाया व त्याचे कारभारी ह्यांनीं गांठोडीं धरून हात अवघडले म्हणून किंचित् उठून हातापायांची चाळवाचाळव केली होती.

प्रभावती वासंतीचें बोलणें ऐकून म्हणाली, " मीं सांगूं का तूं काय आणलें आहेस तें ? मीं जें आणलें आहे तेंच तूं आणलें आहेस—

माझं आतां ओळख म्हणजे चटकन् मी तुझें सांगेन."

" वा: म्हणजे मोठंच सांगितलंस. मी सांगत्यें तू काय आणलं आहेस तें–पाणीदार मोत्यांच्या कुड्या नि एकदाणी असेल–होय ना ?" तिसरी ऊर्फ यमुना म्हणाली.

" नापास एकदम–ढिस् नंबर! हं! तू बोल ग छाये "तिच्याकडे बोट करून वासंती म्हणाली.

" मग फाटका परकर नि तुटकी चप्पल असेल–इश्श मी कसं ओळणार ? सांगायचं असेल तर स्पष्ट सांग. मी आपली स्पष्टच सांगेन मी काय देणार तें–मी चांदीचं नक्षीकाम केलेलं सफरचंद देणार आहें तिला" छाया थोड्याशा सडेतोडपणानें बोलली.

" पुन: तेंच. नो स्पोर्टिंग स्पिरिट" प्रभावती तें ऐकतांच म्हणाली. तोंच वासंतीनें तिला दाबलें. नाहीं तर पुन: पानिपत झालें तर काय करा ?

" मी आपली तिला काय देणार ?" यमुना म्हणाली, " मुलखाचे दरिद्री आम्ही. आणलंय् आपलं साधंच. दोन दोन फोटो एकांत बसतील अशी चांदीची फ्रेम आणली आहे मीं. आवडेल का ग तिला तें ? का नाक मुरडून फेंकून देईल ?

कमलची कड घेऊन प्रभावती लगेच बोलली, " नाक मुरडून फेंकून द्यायला तिला काय अक्कल नाहीं वाटतं ? कल्पना नाहीं तुला यमुना, इतक्या प्रेमळ अंत:करणाची ती आहे कीं, कांहीं बोलायची सोय नाहीं. आपल्या या सर्व वस्तूंचं ती प्रदर्शनच मांडून ठेवील. आणि आल्या गेल्याला प्रत्येक वस्तु कौतुकानं दाखवीत सुटेल. मी तिच्या हाताचे बिल्वर केले आहेत. तिच्या घरीं बिल्वर

ालणं घार्जिन नाहीं. दुसऱ्या कुणीं दिले तर चालतील. अन बिल्व-
ांची तर तिला किती आवड आहे. दाखवूं का तुला मी ते ? ”
ोलतच ती उठली व वर असलेल्या बॅगकडे हात नेणार तोंच वासंतीनें
तेला ओढून थांबविलें व हळूंच तिच्या कानाशीं जाऊन म्हणाली,
“ वेडे, या गाडींत कशाला तसले जिन्नस बाहेर काढतेस ? कुणाची
नजर कशी असते काय ठाऊक ? दुसऱ्याला आपल्या पेटींत काय
आहे तें एकदां माहीत झालं म्हणजे त्याला त्यावर डोळा ठेवायला
सोपं जातं. एवढं कसं तुझ्या लक्षात येत नाहीं ? राहूं दे तें बोलणंच.”
हा उपदेश प्रमावतीलाहि बराच मानवला. ती तशीच खालीं उतरली
। कांहीं तरी बोलायला पाहिजेच म्हणून म्हणाली, “ जाऊं दे मेलं
। ! कोण काढा ? कोण पुनः लावा ? बरं पण काय ग यमुना
तुझ्या वर्गातल्या शीला केळकराचं पुढं काय झालं ? त्रिचारीला
नवऱ्यानं टाकलं असं मीं ऐकलं. काय बाई असतात पुरुष तरी
निर्दय ! ”

त्यांच्या बोलण्याचा ओघ एकदम पालटलेला पाहतांच विश्रामला
आश्चर्य वाटलं. ही बाई बिल्वर दाखविण्यासाठीं वर चढते काय नि
लगेच बोलणं फिरवून बोलते काय ? त्याला कांहींच उलगडा होईना.
तो त्यांचेकडे विस्मयाकुल होऊन पाहूं लागला. त्याची ती जराशी
उत्सुकती नजर पाहून प्रभावतीहि मनांत चरकली व कुणास ठाऊक
कोण मनुष्य कसा आहे तें असा विचार करून तिसरेंच बोलणें काढूं
लागली, “ अन् हें पुस्तक तूं कोणत्या लायब्ररींतून आणलंस ग ? ”
इतका वेळ बाजूला पडलेलें ‘ दिव्यचक्षु ’ पुस्तक हातांत घेऊन
ती छायेला विचारूं लागली. ‘ ह्यांनीं ’ आणलंय बाई कुणा तरी

मित्राकडून, ‘ आम्ही ’ वर्गणीदार नाहीं कांहीं लायब्ररीचे. असेच पुस्तकें आणतात, वाचून झालीं कीं परत करतात. परवां असंच कोणचंसं पुस्तक आणलं होतं, नांव काय बाई त्या पुस्तकाचं—मला वाटतं ‘ जुलूम ’ असेल तें पुस्तक. नाहीं. ‘ शाप ’ होतं तें पुस्तक, निव्वळ शाप होता वाचकावर तो वाचण्याचा. शेवट फारच किळसवाणा केलान् काय ? छाया ‘ कंठ फोडून ’ आतां पुस्तकांचा परामर्ष घेऊं लागली.

कर्जत स्टेशन आल्याबरोबर विश्राम खालीं उतरला व समोरच असलेल्या टी स्टॉलवर जाऊन त्यानें एक सबंध कप चहा घेतला. इकडे तिकडे फिरून पाय मोकळे केले. गाडींतील प्रत्येक डब्यांत तोंड खुपसून आपली पुरुषी दृष्टि फिरवून मनाचें समाधान करून घेतलें. गाडी सुटायच्या वेळेस तो पुन: आपल्या डब्यांत येऊन बसला तों दोन तीन नवीन पाहुणे त्याचे जागेजवळ बसले होते. त्यामुळें जातां येतां त्या सामानाला पाय ठेंचाळत असे. विश्राम आपल्या जागेवर बसला तो जरा दाटणीनेंच. पलीकडील स्त्रियाहि आपला वाक्प्रवाह थांबवून जराशा या नव्या पाहुण्यांच्या आगमनानें संत्रस्त झाल्या होत्या. गाडी चालू होतांच नव्या आलेल्या उतारूनें आपली चिलीम बाहेर काढली व आंगरख्याच्या आंत असलेल्या खिशांतून तंबाखूची पिशवी काढून चिलमींत भरली व काडी पेटवून तो चिलीम ओढूं लागला. त्याच्या धुराचा पहिला कडवट व घाणेरडा भपकारा येतांच विश्रामला मळमळल्यासारखें झालें. खिडकीबाहेर मान काढून त्यानें नव्या व स्वच्छ हवेंत श्वासोच्छ्वास केला. तेव्हां त्याला थोडें बरें वाटलें: वर सुटलेल्या धुराचीं वलयें

हातरुमालानें पुसून टाकून तो चोहींकडे पाहूं लागला तों कल्याणला चढलेला व फॅशनेबल तरुणाजवळ बसलेला एक मनुष्यच तेवढा उतरलेला त्याला दिसला. बाकीचे आपआपल्या कार्यांत मग्न होते. तें कच्छी घराणें दहावी रेकार्ड संपवून ' शांता आपटे ' ची ताजी ' सुनो सुनो बनके प्रानी ' ही रेकॉर्ड लावून माना डोलवीत होते. फॅशनेबल तरुणाची नववी सिगारेट पेटत होती; व त्या मराठ घराण्यानें चौथ्यांदा हातपाय ताणून व उभे राहून मोकळे केले होतें.

चिलमीच्या धुराचा खाट येतांच यमुनेनें तिरस्कार दर्शवीत म्हटलें, " काय बाई त्रास आहे हा ? "

हें ऐकतांच चिलीमवाला उतारू एकदम गरम झाला, " इचिभन काय त्रास हाय ह्मन. त्रास होतुया तर बायांच्या डब्यांत बसा व्होवं तर. मस्त जागा हाय ततं " असें म्हणतच त्यानें पुनः चिलमीचा स्वाद घेतला. तें पाहातांच प्रभावती अतिशय क्रोधविवश झाली. तिच्या मस्तकाची शीर तट्ट फुगली. ती जोरानें म्हणाली, " तें तूं नको आहे सांगायला समजलास. जास्त गडबड करशील तर गार्डाला सांगून दुसऱ्या डब्यांत बसवीन. मुकाट्यानें पलीकडे बसून रहा व तोंडहि थोडेसें गप्प ठेव. "

तिचा तो ' अवतार ' पहातांच त्या चिलमीवाल्यानें मनांतल्या मनांत थोडीशी कुजबूज केली व चिलीम विझवून टाकून तंबाखू खाण्यास सुरवात केली.

पुणें स्टेशनवर गाडी येतांच सर्वांचीच उतरण्याची गडबड सुरू झाली. विश्राम मात्र या गडबडीपासून अलिप्त होता. दौंडला जावयाचें असल्यानें तो स्वस्थपणानें सर्वांची धांदल पहात इकडून तिकडे

फिरत होता. टीस्टॉलवर जाऊन पुन: एकदां सिंगल पिऊन ताजा-तवाना होऊन भिंतीला चिकटवलेली वॉलपोस्टर्स वाचत फिरूं लागला. इकडे छाया आदिकरून सर्व मंडळींची उतरण्याची कोण धांदल उडाली? प्रत्येक जण आपआपलें सामान मोजून घेऊन पहात होते. छायेचें सर्व सामान बरोबर आलें. यमुनेनेंही आपलें सर्व बरोबर असल्याचें सांगितलें. वासंतीची फक्त एक ट्रंक होती. ती तिनें उतरतांनाच हातांत घेतली होती. प्रभावतीच्या सर्व सामानांत एक बॅगच तेवढी सांपडेना. बाकीचें तिचें सामान बरोबर आलें.

इतक्यांत गाडी सुटली व ती सुटलेली पाहतांच पळत पळत जाऊन विश्रामनें आपला डबा पकडला. डब्यांत नीट बसून तो आपलें सामान नीट आहे का तें पाहूं लागला, तों आपली बॅग बाकाखालीं पडलेली त्याला दिसली.

मनाशीं चकूचक करून त्यानें ती बॅग उचलून वर ठेवून दिली व आपलें अपेक्षित स्टेशन येण्याची वाट पाहूं लागला.

थोड्याच वेळांत गाडी दौंड स्टेशनमध्यें शिरली. फलाटावर उतरल्याबरोबर कांहीं पोलीस प्रत्येक डब्यातून उतरणाऱ्या उतारूंच्या हातांतील सामानावर कडक नजर ठेवीत असल्याचें विश्रामला आढळून आलें. आपली बॅग हातांत घेऊन व टिकिट डाव्याच्या चिमटींत पकडून तो तिकिटकलेक्टरजवळ येऊं लागला; तों कोणी तरी आपल्या खांद्यावर हात ठेवल्यासारखें त्याला वाटलें. चमकून त्यानें मागें पाहिलें तों एक पोलीस आपल्याकडे तीक्ष्ण नजर ठेवून पहात असल्याचें त्याला आढळलें.

“कां माझ्या खांद्यावर हात ठेवला?” किंचित् भयाविव्हलतेनें

व जरासें क्रोधानें विश्रामनें विचारलें.

त्याच्या हातांतील बॅगकडे अंगुलीनिर्देश करून तो पोलीस म्हणाला, " ही बॅग आपलीच आहे ना ? "

" हो माझीच आहे ही—कां ? "

" मग आंत काय आहे तें आपल्याला माहीत असेलच ! "

" हो, माझं धोतर, टॉवेल, एक खण, चॉकोलेटच्या वड्या, टूथपावडर एवढ्या वस्तू आहेत. उघडून दाखवितों पाहिजे तर. बोलतच तो बॅग उघडूं लागला तों काय आश्चर्य ! किल्लीच चालेना. विश्रामनें खूप खटपट केली पण व्यर्थ. त्याची ती धडपड पहातांच पोलीसच्या चेहेऱ्यावर एक तऱ्हेची लकेर चमकली. "कशाला रावसाहेब ती उघडायची तसदी घेता ? चला आपण बाजूला जाऊनच ती उघडूं " असें म्हणून त्यानें विश्रामला स्टेशनच्या एका बाजूला नेलं. कबूल करा रावसाहेब ती बॅग चोरली म्हणून. उगीच नाहीं होय करून आमच्या हातचा प्रसाद कां घेतां ? सगळं खुलं सांगून मोकळं व्हा. निदान थोड्या शिक्षेवर तरी सुटाल. " हें ऐकतांच विश्रामला मस्तकावर वज्राघात झाल्यासारखें वाटलें. त्याला हा पोलीस काय म्हणतो आहे हें समजेना. किंकर्तव्यमूढ होऊन तो वेड्यासारखा त्याचेकडे पहात राहिला.

" असं वेडयाचं सोंग घेऊन चालणार नाहीं. बॅगमध्यें काय आहे हें मीं सांगतों तुम्हांला. एक सिल्वर जोड, दोन जरीचीं पातळें, एक चांदीचं भांडं. पहा पाहिजे तर " असें म्हणून जवळ असलेल्या हत्यारानें ती बॅग उघडून पाहिलें तों काय आश्चर्य—अगदीं हेंच सामान ! मग धोतर टॉवेल ? चॉकोलेटच्या वड्या जरीचा खण—

गेल्या कुठें ह्या वस्तू ?

थोड्या वेळांत विश्रामच्या ध्यानांत आलें कीं, गाडींत असलेली त्या बाईची तर ही बॅग नसेल ? ओहो हीच असली पाहिजे. मग माझी कुठें गेली ? कर्जतला उतरलेल्या माणसानें तर पळविली नसेल? आपण दर स्टेशनला उतरून हिंडत असताना पाळत ठेवून तर ही पळविली नसेल ? आपणही त्या बॅगकडे फारसें लक्ष पोंचविलें नाहीं! हाय आतां पुढें ? ह्या पोलिसाची आपण समजूत कशी करणार ; नसती तोहमत आहे हें ह्याला कसें पटविणार ? आणि अशा स्थितींत आपण आपल्या दोस्ताची भेट घेणार ! छेः यापेक्षा काय वाटेल तें होवो. त्याची भेट काय पण नुसती ओळख देखील देणार नाहीं. आलेल्या परिस्थितीस तोंड देऊन कसें तरी पार पडलें पाहिजे असा मनाशी बेत करून तो पोलिसाशी काहीच न बोलता स्वस्थ राहिला.

दौंडहून परत पुण्याला जाणारी गाडी येतांच पोलीसनें विश्रामला परत एका डब्यात बोलाविलें. व त्याचे जवळ तो स्वतः बसला. हा सर्व प्रकार पाहून त्याला नशिबावर हात ठेवण्याशिवाय दुसरें कांहींच करता येण्यासारखें नव्हतें. आपल्यापुढें वाढून येणाऱ्या सर्व संकटांना तोंड देण्यासाठीं तो धैर्य देण्याबद्दल मनांतल्या मनात परमेश्वराची प्रार्थना करीत होता. व कसें पकडलें या आपल्या बहादुरीबद्दल पोलीसमहाशय स्वतःची पाठ मनांतल्या मनांत थोपटून घेत होते.

योग्य वेळीं पुण्याच्या प्लॅटफॉर्मवर गाडी उभी रहातांच पोलिसासकट बॅग घेऊन विश्राम चालत चालला. प्लॅटफॉर्मच्या मध्यभागीं ते येतांच विश्रामला गाडींतील स्त्रियांचें टोळकें आणखीही कांहीं

स्त्रियांना घेऊन कोणाची तरी मार्गप्रतीक्षा करीत असल्याचें दिसलें. पोलिसानें ती बॅग प्रभावतीला दाखवितांच तिनें आनंदानें उडीच मारली.

" ही पहा आपली बॅग्. हीच ना ? ह्या रावसाहेबांनीं ती घेतली होती. " पोलीस बोलला.

" अय्याऽऽ " सगळ्यांनीं चित्कार केला. " ह्यांनीं का घेतली होती ? कहर झाला मग. साव कोण नि चोर कोण हेंच समजेनासं झालंय्. अहो शिष्ठ, कुठं शिकलांत ही कला ? "

" पण पुरेसं ज्ञान नाहीं घेतलं वाटतं या कलेचं ? अरेरे अर्ध्या ज्ञानानं मनुष्याचं नुकसान होतं म्हणतात तें असं- " यमुनेनं एक चिमटा घेतला.

हें ऐकतांच सगळ्यांनीं एक तिमजली हास्य केलें. बिचारा विश्राम ! मेल्याहून मेला झाला. आपण चुकून ती कशी घेतली व सर्वांना तें कसें पटवावें हें विश्रामला सुचेना.

" बघ मीं लागलींच तार दिली म्हणून बर झालं नाहीं ? " वासंतीनें आपल्या शहाणपणाचें प्रदर्शन केलें.

इतक्यांत " काय ग कमल, गाडीवर घ्यायला यायचं म्हणजे असं कोंडाळं करून उभं रहायचं असतं वाटतं ? " असें म्हणत नुकतीच गाडींतून उतरलेली इंदू म्हणाली.

" कोण इंदू ? ओहो ये ये "- कमल असें म्हणत आहे तोंच विश्राम आश्चर्यानें ओरडला. " -कोण इंदू ? "

" कोण ?-इकडे ?-अगबाई असा कां चेहेरा झाला ? आजारी कां असायचं ? "

" म्हणजे हे कोण इंदू ? " प्रभावतीनें विचारिलें.

" अग, हे माझे—इश्श पण बोलायचं कां नाहीं ? "

उदासीनतेनें विश्राम म्हणाला, " काय बोलू ? इंदू-इंदू ह्यांच्या दृष्टीनें मी चोर ठरलों आहे. ह्या कोण तुझ्या मैत्रिणी दिसताहेत. "

" होय. त्याच कमलनें आम्हां सर्वांना संमेलनाकरितां बोलावलं आहे. आपली तार आल्याबरोबर मी निघालें. इथं येऊन पहातें तों आपण इथं. पण काय भानगड आहे ? पोलीस जवळ उभा आहे आपला चेहेरा उतरला आहे. सांगायचं नाहीं का मला ! "

" सांगतों सगळं-आपली एक असली बॅग आहे ना ? "

" हो—अगदीं अश्शीच, कांही फरक नाहीं त्यांत. मी इतका वेळ आपलीच समजत होतें. हो पण काय झालं त्याचं ? "

त्यानें तो सर्व इतिहास सांगितल्यावर सर्वांची खात्री पटली. सर्वांनीं एक सुरानें दिलगिरीनें म्हटलें, " माफी मजला करा दयाळा." इंदू म्हणाली, " याचा आम्ही सूड घेऊं. आमच्या अपमानाची भरपाई चार दिवस ' आमची ' उत्तम रीतीनें सर्बराई करूनच केली पाहिजे. "

बिचारा विश्राम ! त्या चार दिवसांत त्यांची सर्बराई इतकी उत्तम ठेवली गेली कीं, अजून सीक नोट पाठवून रजा वाढवावी काय याचा तो विचार करूं लागला.

# रस्सी–खेंच ! : : ५

संसार हा कशासारखा आहे असें जर विचारलें तर खांडेकर चटकन् म्हणतील कीं, तो एकाद्या काजूच्या गराप्रमाणें आहे, तो एकाद्या खारकेप्रमाणें आहे. आणि मींहि कोटी करण्याचा भगीरथ प्रयत्न केला तर म्हणेन कीं, संसार हा खडे न काढतां केलेल्या भातासारखा आहे. कितीहि जपून घांस चावला तरी खडा दांतांला केव्हां रुतेल याचा नेम नाहीं. कुणाचेंहि मन न दुखविण्याचा मनुष्यानें कितीहि चंग बांधला तरी तो केव्हां निष्फल होईल याचा नेम नाहीं. तारेवरील काम करताना तोल सांभाळण्यासाठीं जशी छत्री हातांत असते त्याचप्रमाणें जगाच्या तंबूंतील संसाराच्या तारेवरील कसरत करतांना नशिबाची छत्रीच हातांत घ्यावी लागते.

हो पण आज एवढा वेदांत सुचायचें कारण एवढेंच कीं, ज्या ठिकाणीं मीं कामाला होतों तेथील मालकाला व्यापारांत बराच नफा झाल्यामुळें आम्हां कारकून लोकांना त्यानें प्रत्येकाला जादा पन्नास रुपये ' खुषी ' म्हणून बहाल केले होते. उपासनी महाराजांच्या शब्दांत सांगायचें म्हणजे ते पन्नास रुपयांचें ' पाप ' मीं घरीं आणलें होतें आणि ते कशा प्रकारें नाहींसें करावें याबद्दल मीं माझ्या आईचा व पत्नीचा सल्ला घेत होतों.

पण पुढें मला आढळून आलें कीं, पैसा हें पाप नसलें तरी सैतान आहे खास !

कारण त्यामुळेंच आमचें घर एकदंम फ्रान्सची रणभूमि झाली. आई

ओसरीवर होती, मी माजघरांत होतों आणि ती स्वयंपाकघरांत होती.

सैन्याची रचना अशी होती.

त्या पन्नास रुपयाचें काय करावें? हा युद्धाचा प्रश्न होता.

स्वयंपाकघरांतून–म्हणजे आमच्या दोस्त राष्ट्रांकडून रडत हुंदकत संदेश आला, "आम्ही म्हणजे या घरांतल्या कुण्णी कुण्णीच नव्हेत ना? आमचा कांहीं या घरांत अधिकार नाहीं कां? कां आम्ही म्हणजे फक्त ताटवाट्या घांसणाऱ्या मोलकरणी? का कपडे धुणाऱ्या परटिणी?"

तो संदेश ऐकतांच माझें हृदय थोडेसें द्रवलें. मीं ममताळूपणानें म्हटलें, "छट् तुला परटिण नि मोलकरीण कोण बरं म्हणतंय्–मालिनी, तूं या घराची देवता आहेस. तूं तर आमची अर्धांगी. तुझ्यावाचून माझ्या घराला शोभा तरी येईल कां? पाण्यावांचून तळें कधीं शोभिवंत दिसेल कां? मालिनी, तूं तर माझ्या गृहाची लक्ष्मी—"

"आणि मी का घरांतली अवदसा? होय विठ्ठल?" ओसरीवरून मासाहेब कडाडल्या. माझा हा नर्म विनोद त्यांना मुळींच न आवडल्यासारखा दिसला. मी समाजवाणीचा सूर काढून तिला म्हणालों, "तसं नव्हे ग आई. अगदींच तूं असं कसं म्हणतेस? तूं तर या गृहाची अधिदेवता आहेस. न मातुः परदैवतम्। आईसारखं दुसरं दैवत नाहीं. अग, प्रिन्सिपाल प्र. के. अत्रे बी. ए. बी. टी. टी. डी. (लण्डन) हे सुद्धां म्हणतात कीं, पत्नि ही क्षणाची असून माता ही अनन्त कालची असते. मग ते खोटं कधीं लिहितील कां? आईशिवाय सगळं व्यर्थ आहे–आई! आई!! तुझ्या उदरींच मीं

जन्म घेऊन पुण्यवान झालों आहें. पुरुषनदाचा आई हा उगम असून पत्नि हें मुख आहे; समजलीस आई. "

" समजलें बरं साऽरं समजलें. पण कांही तरी बोलणं काढून तूं वेळ मारूं नकोस बरं का. माझ्या मनातून कधीच त्र्यंबकेश्वरीं जायचंय्. तुझे वडील असतांना मीं कित्तीदां त्यांना म्हटलं पण हरेराम ! देव म्हणताच त्यांनी कानात बोट घालावं ! अस्से नास्तिक बरं तू तरी मागं पुढं मला घेऊन जाशील अशी आशा. पण तुला मिळणाऱ्या पगारातच जिथं महिना जात नाहीं तिथं कुठलं नाशिक नि त्र्यंबकेश्वर ? रामाची मर्जी म्हणून इतके दिवस मी स्वस्थ होतें. आता देवाच्या दयेनं मिळालेत तुला पन्नास रुपये. देवानंच माझ्या-साठीं तुझ्याकडे पाठवून दिले. आता तरी जीवाचं सार्थक करावं म्हटलं देवाच्या दारीं जाऊन . "

" हो देवाच्या दारींच गेलं म्हणजे सार्थक होतं वाटतं ! " म्हणतात ना ' मन चंगा तो कथोटमें गंगा ' आमच्या राणीसाहेब पटकन् उद्गारल्या, " असं देवाच्या दारीं जाऊन जीवाचं सार्थक झालं असतं तर आख्या जगानं दरवडे घालून, खून करून गोदा-वरींत जीव देऊन मुक्ति साधली असती. आपल्या मनांत भक्ति असली म्हणजे झालं, त्याला एवढा तीर्थाटनाचा देखावा कशाला पाहिजे ? नाशिक उगीच कां होतंय् ? रेल्वेच्या डोम्बलावर व्यर्थ पैसे घालण्यापेक्षां मीं म्हणत्यें आतां सोनं थोडं उतरलयं करावा एकादा डाग, मागं पुढं आपल्याच उपयोगीं पडेल. "

" सोनं उतरलयं कां ? बाईऽग चांगला छत्तीसचा भाव आहे. पन्नास रुपयांत मेलं तोळा दीड तोळा सोनं येणार तरी किती नि

त्यांचा डाग करणार तरी केवढा ? नुस्ती मोहरची अंगठी करायची म्हटलं तरी दोन तोळे सोनं पाहिजे. दीड तोळा सोनं घालणार तरी कुणाच्या नाकांत ? ”

“ पण दोन दिवसांत रेल्वे, हमाली, भटजी यांच्याकरिता, ज्यापासून तिळमात्रहि फायदा नाहीं त्याकरितां, पन्नास रुपयांची राख करण्यापेक्षां छत्तीसनं का होईना पण घेतलेलं सोनं कायमचं तरी राहील ना. ” हातांतील पळी कोंपऱ्यात भिरकावून देत ती म्हणाली.

“ विठ्ठल, विठ्या पोरा त्र्यंबकेश्वरी जाऊन मीं मेल्यें तर एवढ्या मोठ्या माझ्या देहाचं सोनं होईल ना ? तुझ्यावर माझा काहींच हक्क नाहीं ना ? हाय रे कर्मा ! वेलीवरच्या हिरव्या पानाला खालील पाचोळ्याची कुठली आठवण राहाणार ? ” हातांत वळीत असलेल्या वातीला जास्तीच पीळ देत ती म्हणाली.

“ आणि आपल्यावर तर माझा मुळींच हक्क नाहीं असंच ना ? मी म्हणजे कापून बांधलेलं कलम ! जिव्हाळा कसला असणार त्यांत? नि त्यात माझी एवढी पत्रास तरी कशाला मातृदेवतेपुढं ? कशांत कीं लिहिलंयूना–की स्त्रियांना आत्मा नसतो म्हणून. मी म्हणत्यें पत्नीला आत्मा नसतो असें लिहायला पाहिजे होतं त्यांत. ”

सैबेरियांत हद्दपार केलेल्या एका रशियन कैद्याप्रमाणें मी तेथें हे वाक्प्रहार झेलीत होतों. दोघींचे मुद्दे आपआपल्यापरीनें बरोबर होते. ती पत्नि म्हणून घराची स्वामिनी होती. आणि आई तर ? तिची इच्छा पूर्ण करणें माझें आद्यकर्तव्य होतें. नाहींतरी ती माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाला असें हक्कानें विचारणार ?

स्वयंपाकघरांतून पुनः आवाज आला, " मग नाहींच माझं ऐकायचं ? माझ्या बोलण्याला कवडीची देखील किंमत द्यायची नाहीं ना ? मुळींच ऐकायचं नाहींना ? "

" अग ऐकतों ग. पण तूंच पहा आईच्या वयाकडे पाहून, तिनं आजपर्यंत केलेलं माझं पालनपोषण पाहून तिच्या उतरत्या वयांत तिची इच्छा पूर्ण करणं केव्हांहि माझं कर्तव्यच ठरत नाहीं कां ? सोनं काय तुला पुनः आणून देईन, पण निदान आईच्या वयाकडे पाहून तरी तिचें ऐकावें असें मला वाटतें. " मी आईतर्फे " प्लीड " करीत म्हणालों.

" ऐका–ऐका मग त्यांचंच. माझी गेलीची मधें कशाला अडचण हवीय ? खुशाल नाशिकला जा, त्र्यंबकेश्वरीं जा, नाहींतर व्यंकोबाच्या गिरीला जा. पैसे कमी पडत असतील तर माझ्या पाटल्या मोडा हव्या तर. देऊं कां काढून ? " तिच्या रागाचा पारा दर वाक्यागणिक वाढत होता.

मीं किंचित् पत्नीच्या दृष्टीनें विचार केला. मला पगार अगदीं थोडा. जेमतेम संसार चालणारा. अनायासें हे रुपये आले ते जर या नाहीं त्या निमित्तानं खर्चून गेले तर पुनः कुठले दिसायला ? व्यर्थ खर्चण्यापेक्षां थोडेसे कां होईना पण संग्रहीं असलेले काय वाईट ?— आणि आई ? त्या माउलीनें तरी नाशिक कधीं पहावें ? जुन्या लोकांच्या कल्पना त्या ! पण त्यामुळेंच त्यांना चित्तशांति लाभत असेल तर आपणही एवढा स्वार्थत्याग करूं नये कां ? काय करावें ? कुणाला खूष करावें ? तरीपण आई आपल्या बोलांनीं वळते कां तें पहावें म्हणून मीं हळूंच तिच्यापाशीं गेलों. आणि हलक्या

स्वरांत म्हणालों, " आई. "

" काय बाबा ? "

" मीं असं म्हणतों कीं, तुला नाशिक पहायचं ना ? बरं जाऊं, आपण यात्रा असते त्यावेळीं जाऊं. आगगाडीचे दरही सवलतीचे असतात. निरनिराळे लोकही पहावयास मिळतात. पर्वणीच्या वेळीं स्नान केल्याचं पुण्य मिळतं. "—

" पुरे पुरे बरं बाळ असलं बोलणं. तुला न्यायचं नसलं तर नेत नाहीं असं स्पष्ट कां सांगत नाहींस ? बायकोपुढं आईची काय किंमत ? तिच्या खुषीपुढं प्रत्यक्ष जन्म देणाऱ्या आईचा काय पाड ? चक्क नाहीं असं कां सांगत नाहींस ? उगीच लहान मुलांना समजावणीची बोलतात तसलीं बोलणीं बोलून काय उपयोग ? नशिबातच नसेल माझ्या नाशिक पाह्यचं तर तुला अशी बाईलबुद्धि सुचायचीच. इतके दिवस वाटत होतें कीं, माझा विठ्ठल असा बायकोच्या आहारीं जायचा नाहीं. पण नाहीं. नशिबांत असेल तें कां टळणार आहे ?" आणि यानन्तर आईसाहेबांच्या डोळ्यांतून 'नायगारा' वाहूं लागला. मी अगदीं किंकर्तव्यमूढ होऊन गेलों. काय करावें ? दोघींच्या या रस्सी—खेंचींत माझा जीव चेंदून निघत होता. मला वाटलें माझी अशी केविलवाणी स्थिति करायला माझा मालकच कारणीभूत आहे. ह्याला नफा कां व्हावा ? त्यानं आम्हांला पन्नास रुपये कां द्यावेत ? दोघींचा विचार वेगळा कां व्हावा ? हेच पन्नास रुपये आले नसते तर मी थट्टा विनोद करीत जेवलों नसतों कां ? तें कांहीं नाहीं. ह्या गोष्टीची कांहीं तरी तड लावलीच पाहिजे. कारण जगाचा अंत झाला तरी वादाचा अंत होणार नाहीं.

क्षणभर मीं मनाशीं विचार केला. एक विचार ठाम करून अंग झाडून उठलों. कोट टोपी घातली व पायांत चप्पल घालून मी बरोबर जाणार तों दोघींनीं एकदम विचारलें, " कुठें चालला ? "

मी पत्नीकडे तोंड करून म्हणालों, " बाहेर जाणाऱ्या माणसाला असं विचारूं नये, हें माहीत नाहीं वाटतं ? मीं बाहेर चाललो आहे थोडासा. " Better-half उद्गारली, " बाहेर तें दिसतंय् मला. अजून मीं काहीं एवढी आंधळी झालें नाहीं. कुठं म्हणजे कोणत्या ठिकाणीं ? "

" त्याच एका ठिकाणीं—ज्या ठिकाणीं हा माझ्या खिशातील सैतान पिंजऱ्यांत कोंडला जाईल, ज्या ठिकाणीं ह्या पैशाचा खर्च व्यर्थ होणार नाहीं, ज्या ठिकाणीं मला त्यावरही पैसे मिळतील, ज्या ठिकाणीं ह्या ' पापा 'ला पुण्याचें स्वरूप प्राप्त होईल त्याच एका ठिकाणीं—त्या इंपीरियल बँकेंत मी हे रुपये भरायला चाललों आहे. तूर्त या सैतालाला असा कोंडल्याशिवाय आपणा सर्वांचीच डोकीं थाऱ्यावर येणार नाहींत. तूर्त नाशिक बंद—सोनं बंद—फक्त बँक उघडी— "

शेवटीं सांगावयाची महत्त्वाची गोष्ट एवढीच कीं, त्यानंतर आठ दिवस मला जेवण मात्र चांगलें मिळालें नाहीं.

# मनोहरचें मन ! : : ६

" अहो बन्संसाहेब. जरा लौकर आटपा कीं. नुसता चहा पाजायला एवढा वेळ लावलात तर भरवायला केवढा वेळ घ्याल ?" कानावरचे फुगे दोन्ही हातांनीं दाबीत वहिनी म्हणाली.

मकरन्दाच्या तोंडाला लावलेला चहाचा कप खालीं ठेवीत सुमन उत्तरली, " ह्यांत माझा कांहीं दोष नाहीं. बरं ! आपलंहें रत्न—मी म्हणत्यें ध्यान फारच गुणाचं पडलं ! त्याला मी काय करणार ? तोंडापाशीं चहा नेला कीं, पटकन् तोंड बाजूलाच फिरवतं, त्या वेळेस असा राग येतो नि असं वाटतं कीं, दोन्ही हात धरून अश्शी...."

" मारा मारा, मीं का तुमचा नाजूक हात पकडून ठेवलाय ? फारच वाईट झालंय अलीकडे कारटं ! नाहीं तरी हा खुराक खाल्याशिवाय त्याचं अलीकडे पोटच भरेनासं झालंय." आपल्या 'पिला' कडे प्रेमभरानें पहात वहिनी म्हणाली.

पुढ्यांतल्या मकरंदाला एकदम पोटाशीं धरीत सुमन म्हणाली, " नाहीं ग बाई, ह्याला मारायला माझा हात धजावेल तरी कां ? तूं मात्र वहिनी रोज रोज ह्याला प्रसाद देऊन असा हा केलास." बोलत बोलतच सुमननें मकरंदाच्या तोंडाला लागलेला चहा गरम पाण्याच्या फडक्यानें पुसून टाकला, त्याबरोबर मकरंदानें नाखुषीदर्शक त्रागा केला, " अं—अं आम्हांला नको ऽ ! ! "

" जा काय जा ? असाच घाणेरडा कां राहाणार आहेस तूं ? मग तुला बाहेर फिरायला नेणारच नाहीं मुळीं. आतां मी, वहिनी,

भाऊ सगळे सगळे मिळून गंमत पहायला जाणार आहोंत. नीट तोंड स्वच्छ धुवूं दिलं नाहींस तर नेणारच नाहीं तुला. आम्ही टांग्यांत बसून लांब लांब जाणार, मजा करणार, तूं बैस आईपाशीं स्वयंपाकघरांत. नाहीं तर सखूपाशीं डाळ नीट करीत."

टांगा आणि गंमत हे शब्द ऐकतांच मकरंदाच्या चिमुकल्या डोंक्यातील कसल्या तरी गोड तारा छेडल्यासारख्या झाल्या. टांग्यात बसून लांब जाणें ही त्याच्या मतें सुखाची एक अपेक्षा होती. तो एकदम उठला, "आत्याबाई अं-अं मी येतों. अंघोळ घाल मला, मी अंघोळ केल्यावर मला नेशील ना? मी अंघोळ करतों, तीट लावतों, पावडर लावतों, चड्डी घालतों, सद्रा"

"हो हो अरे पुरे सारं समजलं. बघ वहिनी कसा लबाड आहे तो! बाहेर जायचं म्हटलं कीं कसा दुरकून गेला.

बाहेर यायचं असलं तर आज जेवायचं नाहीं म्हटलं तरी कबूल करील पहा. भारी मुलाम झालाय अलीकडे."

"अगदीं तुमच्यासारखा झालाय." सुमनकडे तिरपी नजर टाकीत वहिनीनें हळूंच चिमटा घेतला.

"इश्श माझ्यासारखा म्हणजे? मीं हो काय केलं? किंचित् रोषानें सुमननं विचारलं.

पण प्रश्न विचारितांना कपळाला पडलेल्या चार दोन आंठ्या, आकसून धरलेल्या काळ्याभोर भिवया, चंबूसारखें तोंड केल्यामुळें लालसर झालेल्या नाकपुड्या पाहून वहिनीला खरोखर मजा वाटली. तिनें थोडेसें टक लावूनच पाहिलें नि म्हटलें, "अहाहा वन्सं, मला जर या वेळेस कवितादेवीचें वरदान असतें तर आपल्या मुद्रा-

विर्भावानं मोहून जाऊन एक सुरेखसं काव्यच निर्माण केलं असतं. नि वरती छानदार मथळा दिला असता, ' रोषित अबलेस पाहून. '

मानेला एक लहानसा हिसका देऊन सुमन म्हणाली, " भारीच चाबट झाली आहेस वहिनी तूं. "

" हो कां नाही होणार ? आपल्या भावाच्या संगतीचा परिणाम हा ! मोठी बाईट संगत आहे ही, नि ती तरी एकदोन दिवसाची का ? चागली साऱ्या जन्माची ! "

" आता मात्र कहर केलास बाई ! तुझ्या तोंडाला हाड म्हणून जो पदार्थ आहे तो दिसत नाहीं परमेश्वरानं लावल्यासारखा. अन माझ्या गरीब भावाची बदनामी माझ्याच तोंडावर करतेस ? बोलावूं कां त्याला इथें ? त्याच्या तोंडावर पुन: एकदां असंच बोल म्हणजे मी तुला खरी समजेन; बोलावतेंच त्याला आंत नि पाहातें तुझी मजा. " आणि बाहेरच्या दरवाजाकडे तोंड करून तिनें हांक मारली, " भाऊ, भाऊ, रंगाभाऊ. "

बाहेरच्या बाजूनें उत्तर आलें, " हाजिर है तायडेसाहेब. फक्त एकच मिनिट ! एवढें हें माझें ' वेणीफणी ' चें सामान आवरतों नि येतों. फक्त एक मिनिट ! अवघीं साठ सेकंद, तोंवर प्लीज वेट हं " आणि खरोखरीच एक मिनिटानंतर ' उघडुनि नयना चिमण्या अरुणा ' हें पद आपल्या ' गोड ' गळ्यानें म्हणत रंगाभाऊनें स्वयंपाकघरात प्रवेश केला. त्यानें पुसलें, " किमर्थ पाचारण केलें या नरश्रेष्ठाला ? "

" नरवीरा आपल्या या ' बेटर हाफ ' आपल्याबद्दल कोणते उद्गार काढताहेत ते श्रवण करः त्या म्हणताहेत आपल्या म्हणजे

तुझ्या वाईट संगतीनें त्यांच्या स्वभावांत "

मान हालवीत रंगाभाऊ म्हणाला, " पुरे पुरे. पुढं बोलूच नको सुमन. मला सारं कांहीं समजून चुकलं आहे. बोलूनचालून ही ' बिटर हाफ ' ' बेटर ' नव्हे. मग हें असं व्हायचंच. "

" बिटर–बिटर, वहिनी माझ्या भाऊरायाला कोट्या येतात बरं करायला. तूं नको यापुढं आपल्या कविराज भावाचा पैगार मिरवूंस माझेपुढं ! "

या सर्व प्रवेशांत बिचाऱ्या मकरंदाला पार्टच मिळाला नाहीं. तो एकाद्या प्रेक्षकासारखा उभा होता. शेवटीं त्यांच्या ह्या ' बडबडीला ' तो कंटाळून गेला, व हें नाटक असेंच चालेल तर आपल्याला टांग्याची नि गंमतीची आशा सोडून कोंपऱ्यांत झोंपावें लागेल म्हणून अधीरतेनें त्यानें मधेंच विचारिलें, " आत्याबाई, टांग्यांत बसून गंमत पाहायला जायचं आहे ना ? मग घाल ना मला सदराचड्डी."

हें ऐकतांच सुमननें घड्याळाकडे पाहिलें तों सव्वाआठ वाजले होते. नेहमींच्या संवयीप्रमाणें जीभ दांतांखालीं चावून तिनें आपलें गेलेलें अवधान व्यक्त केलें. " च् च् भारिच नादिष्ट आपण. रंगाभाऊ आज स्टुडिओ पहायला जायचं आहे, हें विसरून जाऊन खुशाल गप्पा मारीत बसलों आपण. ह्या मकरंदानं आठवण केली म्हणून बरं झालं नाहीं ? रात्रीचे आठ वाजले असते तरी आपला हा ' काव्यशास्त्रविनोद ' संपला नसता. नाहीं कां ? "

" होय खरंच ? मघांपासून तेवढ्याकारितां तेवढ्यासाठींच आपल्या ' तायडेसाहेबांना ' लौकर लौकर आटपण्याची घाई करीत होतें. नुस्ता मकरंदाला चहा पाजतां तोंपर्यंत मी इकडलं सारं उरकून

ठेवतें म्हटलें तर एवढा चहा पाजतां आला नाहीं. कसा संसार करतील कुणास ठाऊक? मला तर बाई त्यांची मोठीच काळजी वाटते." गंभीर चेहरा करून वहिनी म्हणाली.

"ए, तुला नको हिची काळजी, आई बाबा आहेत समर्थ. तूं आपली माझी काळजी घेत जा. सकाळ संध्याकाळ दोन वेळां सुग्रास भोजन तेवढं प्रेमळपणानं देत जा म्हणजे मिळविलंस." रंगाभाऊनें डोळे मिचकावित म्हटलें. त्यावर वहिनींनीं बायकांचा नेहमींचा शब्द उपयोगांत आणला.

"भाऊराया, आपल्या ह्या तत्काळ कुमकेबद्दल मी आपल्यावर शतसहस्र अभिनंदनाचा मारा करीत आहे." हंसत हंसत सुमन म्हणाली.

* * *

नट्टापट्टा करण्यांत विशेष वेळ न घालवतां दोघींनींहि आपआपले पोषाख केले. रंगा तर एका मिनिटांतच कोट अडकावून तयार झाला. शिरस्त्राणाची तो विशेष दरकार करीत नसे. असली असली, नसली नसली, मकरंदाला मात्र टोपीशिवाय आणि तीहि जरीची तांबडी असल्याशिवाय होत नसे. एक वेळ चड्डी नसली तरी चालेल, पण टोपी पाहिजे. मोठा सनातनीच होता तो.

थोड्याच वेळांत सर्वजण टांग्यांत बसून मालिनी सिनेटोनचा स्टुडिओ पहावयास गेलीं. मालिनी सिनेटोन दर रविवारीं सकाळीं ९ ते १० प्रेक्षकांना पहायला उघडा असे. उद्यांच रंगाभाऊ नि त्याची बायको परत आपल्या गांवीं जाणार होतीं; म्हणून जायच्या अगोदर बोलपट कसे तयार करतात या जिज्ञासेनें प्रेरित होऊन

तीं सर्व पहायला गेलीं. त्यांत पाहाण्याची विशेष उत्सुकता रंगाभाऊच्या बायकोलाच होती. तिला सिनेमाचें विशेष वेड होतें. हा सीन कसा केला असेल? तें मोठ्या तोंडाचें सिंहासन खरोखरच एवढें मोठें केलें असेल कां? वगैरे सर्व शंका तिच्या डोक्यांत घोटाळूं लागल्या.

स्टुडिओच्या प्रवेशद्वाराशीं टांगा थांबतांच मकरंदानें उडीच ठोकली. रंगाभाऊची बायकोहि आनंदानें झटकन् खालीं उतरली. रंगाभाऊ नि सुमन ह्यांना मात्र एवढी उतरण्याची घाई करावीसी वाटली नाहीं. कदाचित् ही धांवपळ पाहून इतर लोक आपणास गांवढळ समजतील अशी त्यांना भीति वाटली असावी.

सुमननें चोहोंकडे पाहिलें तों लोक टोळ्या टोळ्या करून कांहीं तरी गप्पा छाटीत होते. सायकलची तर अशी रांग लागली होती कीं, एक तासापुरती त्या कोणी भाड्यानें दिल्या तर सहज पंचवीस तीस रुपये येतील अशी एक विनोदी कल्पना तिच्या मनांत चमकून गेली. प्रवेशद्वाराशींच मालिनी सिनेटोन लिमिटेड अशी न्युऑन साईन्सची भव्य पाटी होती. स्टुडिओच्या पुढील बाजूस डायरेक्टर व मालक लोकांचे बंगले एकाद्या पलटनींतील सैनिकाप्रमाणें शिस्तींत बांधले होते. तेथला तो शहरापासून दूर असल्यामुळें आलेला निवांतपणा मनाला विशेष आल्हादित करीत होता. पाठीमागील झाडींनें गर्द आच्छादलेल्या डोंगरावरचे विजेचे प्रचंड खांब आणि त्यांवरून नेलेल्या तारा पाहून तिला वाटलें शहराशहराला आपुलकीनें बांधणारे धागेदोरेच आहेत जणूं! तिच्या मानसमंदिरांतला खांडेकर अजून कांहीं कल्पना करूं लागला तोंच दारावरचा भय्या म्हणाला, " आप आपना नाम देकर अंदर जावो. "

रंगाभाऊनें गेटवर जाऊन आपलें नांव व आलेल्या माणसांची संख्या दिली. पुढें जाण्यासाठीं त्यानें पाऊल उचललें तोंच गेटऑफीस-मधून कोणीसें म्हटलें, " मि. एम्. के. ह्या मंडळीबरोबर जाऊन या तुम्ही. "

पुढें पाऊल उचललेलें सुमननें मागें घेतलें. तिनें चटकन् मान फिरवून मागें पाहिलें तों ' मनोहर ' उभा !

पळभर तिच्या दृष्टीला अंधारी आल्यासारखं झालं. तिनं आपल्या दृष्टीला विचारलें, " कोण मनोहरच कां ! दृष्टीनें उत्तर दिलें, " होय ग बाई हा मनोहरच. अगदीं तुझाच मनोहर. दोन वर्षांपूर्वीं मुंबईला नोकरीला जातों म्हणून गेलेला नि एवढ्या मुदतींत नांवपत्ता नसलेला हाच तुझा मनोहर ! "

मनाच्या असल्या विमूढ अवस्थेंत तिच्या तोंडून शब्दच फुटेना. क्षणमात्र ती तशीच उभी राहिली. तिला त्या स्थितींत उभें राहिलेलें पाहून रंगाभाऊला जरासें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला देखील, " सुमन, इथं काय उभी राहिलीस ? चल ना. बघ तुझी वहिनी स्टुडिओच्या दारापर्यंत गेली देखील. "

हे शब्द ऐकतांच भानावर येऊन सुमननें ' छेः कुठं काय ? ' अशा आविर्भावानें एक कृत्रिम हास्य केलें व ती झराझरा पुढें चालूं लागली. पण तिचें अंतर्मन सारखें म्हणत होतें, " मनोहर आतां सांपडलास नाहीं कां ? मनोहर—मनोहर. "

मनोहरनें एकदांच तिच्याकडे पाहिलें. इथें सुमन भेटेल अशी त्याची अपेक्षाच नव्हती. तिच्यापासून दूर दूर राहण्यासाठीं त्यानें इतके दिवस तिला आपला पत्ता लागूं दिला नाहीं. पण आतां भेट-

त्यावर मात्र त्याचा निश्चय डळमळला. कांहीं तरी बोलण्यासाठीं त्याचे ओंठ विलग झाले. पण बरोबर माणसें आहेत याची जाणीव होऊन त्यानें आत्मसंयमन केलें. एकाद्या अनोळखीप्रमाणें निर्विकार चेहेरा करून तो त्यांचेबरोबर चालूं लागला.

" मि० एम्. के. " रंगाभाऊ आपल्या वाड्याच्याला म्हणाला. " आम्हांला सगळं सगळं दाखवा बरं कां. "

स्मितपूर्वक हंसून एम्. के. म्हणाला, " हो. तें तर माझं कामच आहे. आलेल्या जिज्ञासूंच्या साऱ्या शंका नि जिज्ञासा पुऱ्या करणं माझं कर्तव्यच आहे. '

" कां हो ह्या बोलपटांत तुम्ही कोणतं काम केलं आहे ? " वहिनीनें कुतूहलानें विचारलें.

" मी इथं नुकताच सहा महिन्यांपूर्वीं आलों आहे. त्या वेळेस मी इथं नव्हतों. आतां नवीन होत असलेल्या ' काळाकृष्ण ' या बोलपटांत काम करीत आहे. आतां जातांना सांगणारच सारं आहे मी. इथून जायचं हं. " स्टुडिओच्या दारांत शिरतांच भव्य असा आंतील भाग असलेला पाहून वहिनीला नि मकरंदाला फारच आश्चर्य वाटलं. मकरंद तर आनंदानें नाचूंच लागला. दोन कोंपऱ्यांत चालू असलेल्या बोलपटांतील सेटिंग्ज उभारलीं होतीं. चोहोंकडे विजेचे मोठमोठे दिवे लटकत होते.

" अगबाई, केवढे मोठे हे दिवे ! नि आहेत तरी किती ! "

" अन् हा गोकुळाचा देखावा तरी कसा हुबेहूब केला आहे. " वहिनी म्हणाली.

एम्. के. सांगूं लागला, " आमच्या आगामी ' काळाकृष्ण '

ह्या बोलपटांतील हीं सेटिंग्ज आहेत. पलीकडे नंदाचें घर नि गोठा केला आहे. शक्य तों वास्तवता राखण्यासाठीं आम्ही दक्षता घेतों. इथलं सेटिंग्ज उभें करण्याचें काम संपलें म्हणजे मग शूटिंग करतों. आतां कंसाच्या दरबारचा एक प्रचंड सीन करण्याचं काम चालं आहे. अर्धाअधिक तो तयार आहे. बाकीचा लौकरच होईल. आतां पलीकडे चला. तेथें फिल्म घेतल्यावर डेव्हलप कशी करतात, कशी वाळवतात, त्याचप्रमाणें रेकॉर्डिंगहि त्यावर कसें कसें असतें त्याची सर्व माहिती तेथें आहे. असे असे चला." हातानें त्या रूमची वाट दर्शवीत तो पुढें आला.

स्टुडिओंतील प्रत्येक खोलींत नेऊन तो तेथील सर्व माहिती सांगत होता. ही रंगपटाची खोली, ही वाद्यांची खोली, ही अमुक नि तमुक. पण यातील एकाद्या शब्दाच्याहि लहरीचा सुमनच्या कानावर पडसाद उमटत असेल तर शपथ! एकाद्या मंत्रमुग्ध केलेल्या माणसासारखी ती नुसती पहात होती नि नाचत होती. तिचें मन मात्र मनोहरभोंवतीं सारखें घोंटाळत होतें. मागील सर्व चित्रें तिच्या डोळ्यासमोर नाचत होतीं. आई, बाबा कुणीदेखील आपल्या विरुद्ध नव्हतें. उलट मनोहरसारखा पति आपल्याला मिळणार म्हणून आईनें संदिग्ध रीतीनें एकदां आपली पाठहि थोपटली होती. फक्त मनोहरनेंच काय तें स्पष्ट सांगितलें नव्हतें. एरवीं त्याच्या प्रेमळ कृतींनींच जिथें त्याच्या प्रेमाची परिस्फुटता केली, तेथें कबुलीजबाबाचीच काय जरूरी? एकदां मात्र आपण त्याला स्पष्टपणें लग्नाबद्दल विचारलें; त्यावर असें कांहीं चमत्कारिक रीतीनें आपल्याकडे पाहून तो म्हणाला, "सुमन तुझ्यासारख्या सुंदर नि निष्पाप

मुलीबरोबर लग्न करण्याची मला हिंमत होत नाहीं. " पण त्यावर जेव्हां आपण त्रागा केला तेव्हां त्यावेळेपुरते 'हो हो' करून दुसरे दिवसापासून तो जो बेपत्ता झाला तो आतां भेटतो आहे.

सुमनच्या या विमनस्क वृत्तीकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. रंगाभाऊ, वहिनी नि मकरन्द आपल्याच रससेवनांत मग्न झालीं होतीं. मनोहर मात्र मधून मधून तिच्याकडे पहात होता. आणि त्या पाहण्यांत असा अर्थ होता कीं, सुमन, तुझ्याशीं मला थोडावेळ तरी बोलायला मिळेल कां ?

सुमननें वर पाहिलें तों मनोहरनें आपली नजर तिच्याकडे वळविलेली तिला दिसली. त्याच्या दृष्टींतील एक प्रकारचा कारुण्यभाव पाहून तिच्या हृदयांत खोल खोल कुठें तरी बोंचल्यासारखें झालें. धैर्याच्या डोळ्यांत अश्रून चमकावं असं तिला वाटलं. सकाळचा गार वारा वहात असून देखील तिला आभाळ अंधारलं असं भासलं. या विचाराच्या भरांत स्टुडिओ पाहून केव्हां संपलं हें देखील तिला समजलं नाहीं. दारापाशीं येतांच मनोहरनें सुमनकडे अशा नजरेनं पाहिलं कीं सुमन....सुमन एकच मिनिट, अन् मग जा हवं तर....

कुणाच्या लक्षांत न येईल अशा रीतीनें सुमननें मान हलविली. ती तशीच पुढें गेली. रंगाभाऊ टांग्यांत बसल्यावर ती म्हणाली.

" भाऊ, इथ माझ्या एका मैत्रिणीकडं काम आहे थोडेसें. आतां आयतं इथपर्यंत आल्यें आहे तर तेवढं करून येतें. तुम्हीं पुढं जा. जेवावयाच्या वेळेला येतेंच तिची सायकल घेऊन. "

" अग पण सुमन " रंगाभाऊ त्यावर कांहीं आढेवेढे घेणार तों किंचित् चिडून सुमन, म्हणाली " अग नाहीं न कांहीं नाहीं; येतें

म्हणतें ना मागाहून "

" बरं बोवा. केव्हां वाटेल तेव्हां ये " असें म्हणतच त्यानें टांगेवाल्याला चालविण्याचा इषारा दिला.

रंगाभाऊचा टांगा दृष्टीआड झाल्यावर सुमन परत वळली. फाटकाच्या आंत येऊन चालूं लागली तों दारावरचा भय्या ओरडला, " देखनेकी टाईम खतम हो गई है. अब तुम अंदर नहीं जा सकेंगे "

ती एकदम तेथेंच उभी राहिली. तोंच पलीकडून आवाज आला, " रामकिसन उन्कु अंदर आना दो "

आणि आवाजाच्या मागोमाग मनोहर हंसत आला.

" ये सुमन, आपण बिऱ्हाडीं जाऊं. निवांतपणें बोलतां येईल तेथें. होय ना "

सुमन कांहींच बोलली नाहीं. ती मुकाट्यानें त्याच्या मागोमाग चालली. तिच्या मनांतला विचारांचा सागर हेलावत होता. मुखावर विलक्षण आर्तता पसरली होती.

बिऱ्हाडांत आल्याबरोबर मनोहरनें वाकडी तिकडी पडलेली खुर्ची नीट सरळ ठेवली. सकाळच्या डाकेनें आलेलीं पत्रें न फोडतांच बाजूला सारून ठेविलीं. खोलीची एक खिडकी अर्धवट उघडली गेली होती ती पूर्ण उघडीत मनोहरनें म्हटलें, " सुमन, बैस त्या खुर्चीवर. "

किंचित् हंसल्याप्रमाणें सुमननें मान हालविली. बोलायला सुरवात कशी करावी हें तिला समजेना. गोंधळून जाऊन ती खोलींतील वस्तू पाहूं लागली. समोरच टेबलावर मनोहरचा फोटो होता. तिच्या उजवीकडच्या भिंतीवर एक ग्रुप फोटो लटकत होता. नीटसा

दिसेना म्हणून तिनें किंचित् वाकून पाहिलें तों अगदींच साधारा प्रतीची स्त्री नि मनोहर एकमेकांशेजारीं उभे होते. त्यांच्या पुढ्यांती एका छोट्या स्टुलावर एक दहा बारा महिन्याचें बालक हंसत होतें.

हें पाहिलें मात्र तिच्या मस्तकात कसलीशी विलक्षण चमक मारिली ती आवेगानें म्हणाली, " मनोहर, अखेर फसवलंत ना मला ? "

" तुझ्या दृष्टीनं असेल पण माझ्या नाहीं. " शातपणानें मनोह म्हणाला. त्याच्या बोलण्याची शांतता, हाच प्रश्न येईल हें दर्शवीत होती

"प्रत्येक अपराधी आपल्या दृष्टीनं धर्मराजाचा अवतारच असतो."

" सुमन, सुमन कशाला बरं हे घाव घालतेस ? मी अपराधी आहे पण मी अपराध का केला हें ऐकल्यावर मात्र, तूं माझी कीं केल्याशिवाय राहणार नाहींस. दोन वर्षांपूर्वी मी इथून नाहींस झालेलों पाहून तुझ्या जिवाला झालेल्या असंख्य यातना प्रत्यहं माझ्या डोळ्यासमोर उभ्या राहातात. प्रत्यहीं तुझा केविलवाण चेहरा माझ्यापुढं उभा राहातो. "

" आणि तूं दिलेलीं वचनं, केलेल्या आणाभाका, मनांत उभविले भावी सुखाचे मनोरे तीं मात्र सारीं विसरून गेलास नाहीं कां ? "

" विसरलों नाहीं, सुमन अगदी तुझ्या गळ्याशपथ ! अद्याप तीं माझ्या मनाच्या आतल्या कप्प्यात शाबूत ठेवून दिलीं आहेत. सुमन माझ्या आयुष्यांतील तीं ओलाव्याचीं ठिकाणें आहेत. "

" असं दुटप्पी बोलणें तुम्हां पुरुषानांच शोभतं " सुमन किंचि कठोरतेनें म्हणाली.

व्यथित अंतःकरणानें मनोहर लागलाच म्हणाला, " दुटप्पं नाहीं हें सुमन, काय नि कसं सांगूं ? कदाचित बोललों तर तुझ

अपमान केल्यासारखं होईल; पण पोटांत राहात नाहीं म्हणून बोलतों. सुमन, आपलं लग्न झालं असतं तर दोघांच्याहि सुखाला वणवा लागला असता. ”

हें शब्द ऐकतांच अंगावर एकादा साप पडावा तसें सुमनला झालें. तिची वृत्ति बधिर होऊन गेली. ज्याच्यासाठीं आपण एवढा जीव पाखडला त्याच्या तोंडून असे उद्गार ?

“मनोहर, बोलंवतं तरी कसं हें तुला?” तिनें व्याकुळतेनें विचारलें.

खुर्चीवर नीट बसून मनोहर म्हणाला, “ सुमन, आधीं त्या खुर्चीवर नीट बैस. सारं सांगतों. मात्र माझ्यावर असलेली तुझ्या प्रेमाची सावली हें ऐकून निघून जाईल अशी मला भीति वाटते. म्हणून सुमन तुला एक विनति, प्रार्थना करतों कीं, सारं ऐकून घेतल्यावर माझ्यावर न प्रेम दाखविता नुसती सहानुभूति दाखविलीस, तरी मी भाग्यवान समजेन.” बोलता बोलतां मनोहरचा कंठ भरून आला. त्याच्यानें पुढें बोलवले नाहीं.

“ मना-मना कसं रे बोलतोस असं ” कंपित स्वरांत सुमन म्हणाली. “ ऐक सुमन, मन घट्ट करून ऐक. मीच तुझ्या प्रेमाला लायक नव्हतों. माझ्या स्वभावांत एक मोठा न्यूनगंड आहे. एरवीं मी कितीहि संभावीत असलों तरी माझा स्वभाव अत्यंत मोहवश आहे. कुणाहि स्त्रीकडे मी तावडतोब आकर्षिला जातों. माझं मन इतकं चंचल आहे कीं, निष्ठा म्हणून कुणावरच मला प्रेम करतां येणार नाहीं. आज ज्या स्त्रीकरतां मी प्राण टाकीन तिच्या उद्यां मरणोन्मुख स्थितींत तोंडांत पाणी घालण्याइतकें देखील प्रेम उरणार नाहीं. आणि त्यांतून माझा निर्वाह नटाच्या पेशावर, कितीतरी

भल्याबुऱ्या स्त्रीपुरुषांशीं माझा संबंध येणार. मग मी किती वाहवेन याचा नेम नाहीं. अन् सुमन खोटं सांगत नाहीं. माझ्या या स्वैर जीवनाला थोडासा लगाम बसत असेल तर केवळ तुझ्या आठवणीनं. लज्जा वाटण्यासारखं एकादं कृत्य मोहाच्या भरांत माझ्या हातून घडलं तर तुझी आठवण होतांच मला एक तऱ्हेची भीति वाटते, पश्चात्ताप वाटतो. माझ्या मनांतल्या तुझ्या मूर्तीपुढें मी क्षमा मागतों."

" माझ्यावर देखील तूं एकनिष्ठेनें प्रेम केलं नसतेस ना ? "

" फक्त कांहींच दिवस. तिन्हीं त्रिकाळ जर तुझं सांन्निध्य मला लाभलं असतं, तर तुझ्या प्रेमाचा आणि सौंदर्याचा माझ्या मनाव-रचा कैफ उतरून गेला असता. माझ्या चंचल मनानं पुनः उसळी खाल्ली असती. आणि सुमन तुझं जीवित मात्र मी दुःखी करून टाकलं असतं. माझं मन असं बेलगाम आहे कीं, तुझे कोणतेच पाश मला बांधू शकले नसते. तुझं जीवन असं दुःखीकष्टी होऊं नये म्हणून मी इथून निघून गेलों. "

" पुरे पुरे " आवेगानें तोंड झाकून स्फुंदत सुमन म्हणाली,

" जास्त सांगून कशाला माझ्या मनाच्या व्यथा वाढवितोस ? "

" माझ्या बोलण्यानं तुला त्रास होत असेल. पण झालंच माझं बोलणं. अवचित आज भेटलीस. तुझ्याशीं खूपखूप बोलावंसं वाटलं; म्हणून तुला विनंति केली. थोरमनानं तूंहि इथं आलीस. पण हें काय ? सुमन रडते आहेस तूं ! सुमन ! सुमन ! "

मनोहर भावनेच्या भरांत एकदम खुर्चीवरून उठला. रडत असलेल्या सुमनचे दोन्ही हात डोळ्यावरून एकदम काढून तिचे अश्रू

# रजेपुरता वैद्य : : ७

दोनचे ठोके पडताच पार्वतीबाईनीं समोरची पोथी नीट बांधून
ून भक्तिभावानें नमस्कार करून वरच्या कोनाड्यांत ठेवून दिली.
ाच वेळ वाचीत बसल्यामुळें अंग अवघडलेसें वाटल्यामुळें त्यांनीं
अग आई ग ' असा दु:खोद्गार काढीत गुडघ्यावर भार देऊन त्या
उल्या. आज शनिवार असल्यामुळें रघुवीर शाळेंतून अडीच वाजतां
णार होता. तेव्हां त्याला कांहीं तरी खायला करण्यासाठीं त्या
वयंपाकघरांत आल्या. रघुवीरला कच्च्या पोह्यांचा चिवडाच फार
ावडत असल्यामुळें पोहें काढून घ्यावेत ह्या हेतूनें त्यांनीं बाजूच्या
ामानाच्या शेल्फकडे पाहिलें तों पोह्यांचा डबा त्यांना तेथें दिसला
ाहीं. कदाचित् आंतल्या खोलींत असेल असें वाटून त्या पुन:
उठल्या, तो त्यांच्या कंबरेला विलक्षण लचक भरल्यासारखी वाटून
या दु:खावेगानें तेथेंच बसल्या. बसूनच यांनीं हांक मारली
' सूनबाई. '

पण बाहेरच्या दिवाणखान्यांत सूनबाईच्या जिवाची कोण धांदल चालली होती. दुपारच्या सिनेमाच्या जादा खेळाला जाण्यासाठीं त्या वेषभूषा करीत होत्या. पहिल्यांदा त्यांनीं जरीचें लुगडें नेसून आरशांत पाहिलें, रूप न्याहाळलें, तों शि: ! ह्या भर उन्हांत कां मला हें शोभणार आहे ? असें टीकात्मक बोलून करवती दाते असलेल्या काळ्या कांठाचें पांढरें पातळ तिनें काढलें. त्या पातळाची नेसण पुरी होत आहे तों त्यांच्या मनांत आलें कीं, ह्याला शोभणारा ब्लाऊझ पण

कोठें आहे आपल्यापाशीं ! पांढरें पातळ नि हिरवा ब्लाऊझ ! वा: माझ्या रंगसंगतीची लोक परीक्षाच करतील ! नि ' त्यांच्या ' तरी पसंतीला हें उतरेल कां ? सूनबाईच्या मनाचा असा गोंधळ उडाला होता. त्या चडफडत कपाटांतील पातळाशीं ' दांडगाई ' करीत होत्या, तों पार्वतीबाईची हांक त्यांच्या कानीं आली. मनाशीं चिडून ती पुटपुटली, ' एक क्षणभर देखील ह्या उसंत घेऊं देत नाहींत मला. म्हणायचं सूनबाई ! पण कामें सांगायचीं किती ! सूनबाई हें कर, सूनबाई तें कर, दगडन् धोंडे. त्यापेक्षां मी सारं करीत जाईन; पण ' ह्याना ' आहे ना आपल्या आईसाहेबांच्या प्रेमाचा गोडा ! आईच्या हातची भाकरी खाल्ल्याशिवाय ह्यांचं पोटच भरत नाहीं म्हणे. जसं काही आईच्या मागं हे उपाशींच रहाणार आहेत ! नसतं मेलं सोंगच माजवायचं. ' स्वयंपाक घरांतून पुन: हांक आली, " सूनबाई, तेवढा पोह्यांचा डबा आणून दे पाहूं. "

म्हातारीवरचा राग पातळावर खसूकन फेकून देण्यांत काढून अत्यंत त्रासिक झालेली मुद्रा कशीबशी थाऱ्यावर आणण्याचा प्रयत्न करीत विमल स्वयंपाकघरांत आली व शेल्फकडे पाहत म्हणाली, " इथंच होता ना डबा. "

" इथं नाहीं आहे तो. काल पोहे नीट करतांना मधल्या घरांत नेला होता तिथं असेल तो. "

सासूबाईच्या लक्षांत न येईल अशा जोरानें हातपाय आपटीत विमल मधल्या घरांत आली. डब्यांतील पोहे ताटांत काढून घेऊन तिनें ते पार्वतीबाईच्या पुढें नेऊन ठेवलें व पुन: आपल्या नववस्त्र–

" तेवढं तिखटामिठाचं पाळं खालीं ठेवून जा. उठवत नाहीं आज अगदीं. कंबर कशी लचकल्यासारखी झाली आहे. " बोलतां बोलतां त्यांना पुनः चमक मारलीशी वाटून त्यांनीं एक दुःखोद्गार काढला! आपल्या गोऱ्यापान कपाळावर आंठ्याचें जाळें फुलवून विमलनें पाळें खालीं काढून ठेवलें. पुनः कांहीं म्हातारीचा हुकूम सुटतो कां याची मिनिटभर वाट बघून तिनें दिवाणखान्याकडे मोर्चा वळविला.

आपल्या पातळाच्या निवडणुकीला जसजसा उशीर होत आहे, तसतशी सिनेमाची वेळ जवळ येत आहे असें पाहून डोळे मिटून जें पातळ हातांत येईल तेंच नेसून तयार व्हावें असा विमलच्या मनानें सुवर्णमध्य काढला. नाहीं तर जादा खेळच काय, पण रात्रीचा दुसरा खेळ जरी संपून गेला, तरी आपल्या मनांतलें हें आंदोलन स्थिर होणार नाहीं असें तिला वाटलें. डोळे मिटून तिनें पातळ काढलें, अन् हाय रे दुर्दैवा ! तिनें पहिल्यांदा नेसलेलेंच जरीचें हिरवें पातळ पुनः तिच्या हातांत आलें. किंचित् नाराजीनें तिनें पातळाची घडी सोडली.

तोंच पाळण्यांतून केबल आली ! " आई अं ऽऽ "

" तुम्हींही उठलांतच कां ? " त्रासिकतेनें ती पुटपुटली, " अस्सं अगदीं वेळ साधून उठत जा. नाहीं तर दूध घालायलासुद्धां उठवावं लागतं झोपेंतून बाळाला. एरवीं हव्वा तितका वेळ झोपेल, पण आज ! सिनेमाला जायचं ना ! मग सारींजणं छळून घेतल्याशिवाय कां राहतील ? " मनाशीं बोलतच ती लुगडें नेसूं लागली. पण पाळण्यांतील बाळजीवाला एवढा उशीर कसा खपावा ? त्यानें एकदम नापसंतीदर्शक त्रागा केला, " आंई—आईऽऽऽ" "आलें रे मेल्या"

नहून ती म्हणाली, "जरा कुठं वेळ लागला कीं, रडून घर ोक्यावर घेतो आहे. रडूं लागल्याबरोबर धांवतपळत पाळण्यापाशीं जर झालं पाहिजे जसं कांहीं! जणूं याचे आम्ही नोकरच—"

"नोकर कोण? मालकीणबाई तुम्ही साक्षात्" आंत येतांना ोझरतें बोलणें ऐकून रघुवीर म्हणाला, "पण आंतून बाबूची ंकाळी ऐकूं येत आहे तिकडे लक्ष नाहीं वाटतं आपलं?"

त्याला एकदम आंत आलेला पाहून बिमल जराशी लज्जित ाली. ती हळूच म्हणाली, "मग घ्यावं जरासं त्याला. दिसतें ाहे ना मी कामांत आहें ती! तिचें सर्वांग न्याहाळून हंसत घुवीर म्हणाला, "ओः कसलं पण मोठं काम!" यावर त्याचें ाहीं तरी मोठें थोरलें लेक्चर होईल या भीतीनें तिनें मध्येंच ाडिकतेनें म्हटलें, "असूं द्या आमचं कसलं तरी काम! घ्यायचं ाला अगोदर" आणि त्याला विशेष खुलविण्याच्या हेतूनें तिनें ढें म्हटलें,

"अन् आई तर केव्हांच्या बसल्या आहेत आपली वाट पहात. घापासून चार वेळां त्यांनीं मला विचारलें"—

"काय;"

"आपण आलांत कां ते!"

"असं म्हणाली आई? अगदीं हेच शब्द? नीट सांग आई ाय बोलली तें. अगदीं तिचे शब्द हवेत मला ऐकायला." हंसून घुवीरनें सांगितलें. त्यावर लाजून विमल उत्तरली, "इश्श, त्यांचे ाब्द मी कशी उच्चारूं?" आजूबाजूला पहात रघुवीर म्हणाला,

ऐकायला ? मग विमल, बोल ना काय म्हणाली ती ?" किंचित् गंभीर चेहरा करून विमल म्हणाली, "आपल्याला काय बाई, जसा हुकूम होईल तसं वागायचं. आडांत जीव दे म्हटलं, द्यायचा; सांग म्हटलं, सांगायचं; सांगू ? त्या म्हणाल्या, "रघुवीर नाहीं कां आला अजून ?"

"आलाय बरं बाईसाहेब. अगदीं आपल्या पायापाक्षीं हजर आहे !" तिचा हात आपल्या हातांत घेऊन तिच्या लाजून चूर झालेल्या मुखाकडे पाहत हंसत रघुवीर म्हणाला, "कांहीं हुकूम आहे कां आपला ?"

त्याच खेळाडूपणानें विमलनें उत्तर दिलें, "हो, आहे, बाबूला घेऊन जरा खेळवा, अन् सिनेमाला जायचं आहे हें लक्षांत ठेवून लौकर सज्ज व्हा."

होकारदर्शक मान डोलवीत रघुवीर आंत गेला व पाळण्यांतून मुलाला काढून घेऊन हातांवर झेलीत स्वयंपाकघरांत येऊन बसला. समोर बसलेल्या पितापुत्राकडे पार्वतीबाईंनीं एकदां नीट न्याहाळलें. आपला रघुवीर––नि रघुवीरचा रघुवीर किती छान आहेत माझीं बाळं ! रघुवीर अगदीं थेट असा दिसत होता लहानपणीं. लागलीच गतकालांत त्यांच्या मनानें भरारी मारली. आपलें हातांतलें काम विसरून त्या तशाच आतुरलेल्या नजरेनें पाहूं लागल्या.

त्यांचें तें टक लावून पाहणें रघुवीरला जरासें चमत्कारिक वाटलें. तो गोंधळून म्हणाला, "हें काय आई ! असं कां पाहातेस ? कांहीं होतंय् कां तुला ? बरं कां वाटत नाहीं ?"

याबर लागलीच भानावर येऊन बळेंच हंसून त्या म्हणाल्या,

" छे रे, मला कुठं काय होतंय्? हो, पण पाय धुतलेस कां तूं? तुझ्यासाठीं पोह्यांचा चिवडा करून ठेवलाय्. जा बाळ, ऊठ, हात-पाय धू. कित्ती उन्हांतून आलास तूं! तुझाच चेहरा उन्हानं उतरल्यासारखा दिसतो आहे."

" वा! मला काय झालं आहे! तुझं आपलं कांहींतरीच. हो, पण चहा टाक लौकर. आतां सिनेमाला जायचं आहे. चल, आटप लौकर!"

यावर मुकाट्यानें पार्वतीबाईनीं चहाचें आधण टाकलें. थोड्याच वेळांत आपला जामानिमा आटोपून विमल आंत आली. तिच्या त्या थाटाकडे पार्वतीबाईनीं पाहिलें. समुद्रांतून वर आलेल्या लक्ष्मीसारखी त्यांना ती दिसली!

" आई, ही करील चहा, बाजूला हो तूं. तुझ्या जिवाला बरं वाटत नाहीं म्हणून म्हणतों."

रघुवीरच्या या बोलण्यावर विमलनें किंचित् निषेधप्रदर्शक मान हालविली. आतां चहासाठीं चुलीपुढं बसायचं म्हणजे एवढा केलेला खटाटोप नाहीं कां व्यर्थ जाणार? चुलींतली राख उडून, पातळ नाहीं का खराब होणार? छे बाई, अगदींच 'ह्यांना' कळत नाहीं. असा तिच्या मान हालविण्याचा अर्थ होता.

" छे रे, मला काय एवढा चहा करतां येणार नाहीं? सूनबाई एवढें दूध मात्र बाळाला पाजीव हं; घे बाई ती वाटी" हें ऐकल्यावर विमलचा चेहरा खुलून आला.

चहाचा प्रोग्राम आटोपल्यावर विमलनें घड्याळाकडे पाहिलें.

सुरू होणार नि आपण तर अजून इथेंच, या विचारानें तिचा जीव बैचेन झाला. तिनें अधीरतेनें म्हटलें, " पाहिलंत ना घड्याळांत किती वाजलेत ते ? चलायचं ना मग. "

" चांगलीं दहा मिनिटं आहेत अजून अन् थिएटर का लांब आहे इथून ? भारीच बोवा तूं उतावीळ ! आतां चहा-चिवडा झालाय् , पोट कसं जड झालं आहे. इतकी धांवपळ आपल्याच्यानं नाहीं बोवा होणार. जरा सावकाशीनं घे ! "

" नका बाई माझा असा विरस करूं. जायचं म्हणून ठरल्यावर न गेलों तर माझ्या मनाला कशी रुखरुख लागते. तुम्हां पुरुषांचं ठीक आहे. एकटे असतां. मनांत आल्याबरोबर जातां. पण आमचं का तसं आहे ? "

" तुम्ही सवत्स आहांत हें आम्हांला माहीत आहे. पण मी म्हणतों, झाला थोडा उशीर तर तिथं कोणी दंड-शिक्षा तर करणार नाहीं ना ! जाईल फार तर एखादा रील. " मुद्दाम रेंगाळत रघुवीर म्हणाला. तेथेंच एका खुर्चीवर बसून निराशेनें विमल म्हणाली, " नकोंच मग जायला. असला अर्धा सिनेमा पाहिल्यापेक्षां घरांत बसलेलं कायं वाई ? "

" ओः तेंही कांहीं वाईट नाहीं. असली सुबुद्धि सुचली तर माझे पैसे वांचतील. झालं म्हटलं, तर तेवढेंच संसाराला उपयोगी पडतील. काय, खरं ना ? " निराशेनें रडकुंडीला आलेल्या विमलकडे हंसत पाहत रघुवीर म्हणाला.

मधल्या घरांत काम करतां करतां पार्वतीबाईंना हें सारें बोलणें ऐकूं येत होतें नि कौतुकही वाटत होतें. किती खेळीमेळीनं हीं मुलं

बागताहेत. हातांतलें काम टाकून त्यांनीं त्यांच्या बोलण्याला कान दिला. रघुवीर म्हणत होता, " ए: रडायला काय झालं ? सिनेमा नाही म्हटलं कीं रडूं यावं इतकं ? चल, पूस ते डोळे; अगदींच वेडाबाई आहेस. उगीच उगीच गमतीनं बोलों तें खरंच वाटतं तुला ? अशी रडकी बायको आपण नाहीं नेणार बरोबर. जरा हंसरं तोंड कर ना ! "

ऊन पडतांच पाण्याचे थेंब चकाकावेत तसे आनंदानें तिचे डोळे चमकले. " हो, असं बोललं म्हणजे झालं वाटतं, हें तरी खरं ना पण ? नाहीं तर उंबऱ्याच्या बाहेर पाऊल टाकल्यावर पुन: फिरायचे बेत—झालेच पहा तीन—"

डोळे पुसून तोंड स्वच्छ करीत आनंदानें विमल म्हणाली.

" अग, पण आईला येऊं दे ना, बोलाव तिला ! "

हे ऐकतांच पार्वतीबाईंना रघुवीर आपल्यावर किती प्रेम करतो आहे याची जाणीव झाली. त्या मनांत आनंदून म्हणाल्या, " कशाला, बाळ मला म्हातारीला सिनेमा नि फिनेमा. काय करायचा आहे मला ? तुझं प्रेम मला मरेपर्यंत मिळालं म्हणजे झालं. " आतां सूनबाई बोलवायला आली म्हणजे तुम्ही जा; मी आजारी माणूस कसं येणार म्हणून सांगावं, असें मनांत आणून त्या बाजूला ठेवलेलं काम पुन: पुढ्यांत ओढून करायला सुरवात करणार तों सूनबाईचे शब्द त्यांच्या कानीं पडले.

" इश्श ! म्हणजे सासूबाई कां येणार आहेत बरोबर ? "

" कां, तिनें सिनेमा पाहूं नये कीं काय ? "

" तसं नव्हे, पण आपण तरुण माणसांत त्यांच्यासारखं वयानं

झालेलं माणूस आलं म्हणजे तेवढा आपल्याला संकोच नाहीं कां वाटायचा ? त्यांची अडचण नाहीं कां होणार आपल्याला ? ”

हे शब्द ऐकले मात्र ! पार्वतीबाईच्या हृदयावर एकदम कुणीतरी घाव घातल्यासारखें वाटलें. “ माझी अडचण, माझ्या पोरांना मी गेल्यें तर माझीच अडचण होईल ? त्यांचं मी इतकं कौतुक करीत असतांना त्यांचीं कुचंबणा होईल ? ” त्यांचा कंठ भरून आला. “ माझ्या पिलांना माझी अडचण ! पांडुरंगा, असं कसं होईल रे, माझ्या हातून ? त्यांना तरी कसं वाटलं ? ” दुःखावेगानें त्यांचे दोन्ही डोळे भरून आले. असहायतेनें त्यांनीं तेथेंच अंथरुणावर अंग टाकून दिलें.

आंत येऊन रघुवीर आईला जातों म्हणून सांगायला आला; तों त्या झोंपी गेल्या आहेत असें त्याला वाटलें. उगीच कशाला उठवा म्हणून दार पुढें करून तो आणि विमल सिनेमा पहायला गेलीं.

वरील गोष्टीला दोनच दिवस झाले होते. पार्वतीबाई खिन्न मनानें आपलें काम करीत होत्या. मनांत त्या अत्यंत उदास झाल्या होत्या. कोणत्याच गोष्टीचा त्यांना उल्हास वाटत नव्हता. ज्यांच्या-बद्दल आपण एवढें जिवाचें पाणी करावें, त्यांना त्याबद्दल कांहींच न वाटतां उलट आपलीच अडचण वाटावी, याबद्दल त्यांच्या मनाला अत्यंत क्लेश झालें. तरी सकृद्दर्शनीं त्या तसें न दाखवितां नित्या-प्रमाणें काम उरकीत होत्या.

रघुवीर सकाळचा चहा पिऊन वर्तमानपत्र चाळीत बसला होता व विमलही तेथेंच कायसें करीत होती. इतक्यांत काय झालें कुणाला ठाऊक. विमल एकदम भीतीनें ओरडली, “ अग बाई ! असा कां

माझा बाळ करतो आहे---पहा हो जरा याला---रघुवीर ताडकन् उठला व विमलपाशीं येऊन पाहूं लागला, तों त्याला तें पाहून चमत्कारिक वाटूं लागलें--- त्यांची गोंधळलेली मुद्रा पाहून अगदींच धीर सोडून विमल म्हणाली, " आईला तरी बोलवा अगोदर. त्यांना तरी दाखवा हा असा कां रडतो आहे तें. उठा, उठा हो, बघवत नाहीं मला हें. बोलवा त्यांना अगोदर; नाहीं तर मीच हांक मारतें. आई, आई "— तिची ही हांक ऐकतांच पार्वतीबाई धांवत आल्या. त्यांना वाटलें कदाचित् बाळाला कांहीं तरी चावलें असेल म्हणून सूनबाई भीतीनें ओरडली असेल; पण प्रत्यक्ष पाहतात तों बालग्रहाच्या झटक्यानें तें मूल हातपाय झाडीत होतें आणि फिरवीत होतें. पार्वतीबाईंना पाहतांच एकदम मोठ्यानें रडतच विमल ओरडली, " आई, पहा हो माझा बाळ कसा रडतो आहे तें; असा कां करूं लागला आहे हा; पहा पहा हो जरा. डॉक्टरला तरी घेऊन या. आः माझा बाळ माझा बाळ--- कसं करूं रे मी. " आणि तिनें पुनः रडायला सुरवात केली. तिला धीर देत पार्वतीबाई म्हणाल्या, " असं काय वेड्यासारखं करते आहेस सूनबाई. अग, लहान मुलांचीं दुखणीं हीं, त्याला का एवढं घाबरावं लागतं ? चल, ऊठ, दे त्याला माझ्या मांडीवर नि वेखंड नि आलं घेऊन ये. ऊठ, रडूं नकोस अगदीं, ह्याला काय होतंय् ? जाईल आतां हा झटका, अग, थंडी बाधली, दुसरं काय ? "

त्यांच्या मांडीवर मुलाला देऊन विमल वेखंड वगैरे पाहण्यासाठीं धांवाधांव करूं लागली. तसल्या प्रसंगीं कां तिला ते जिन्नस लौकर सांपडणार होते ? अगदीं रडकुंडीला येऊन ती शोधूं लागली; पण

थोड्याच वेळांत जरूरीच्या वस्तू तिला सांपडल्या. त्या त्यांच्या पुढें ठेवून बाळाच्या अवस्थेकडे पाहात विमल हुंदका देत म्हणाली, " पहा ना माझ्या बाळाकडे जरा—अजून झाडतोय् पाय्. "

" रडूं नकोस, अगदीं गप्प रहा. आतां रघुवीर डॉक्टरला घेऊन येईल व सारं काहीं नीट होईल. घाबरून जाऊन कां कुठं भागत असतं ? रघुवीरला देखील लहानपणीं एकदां असंच झालं होतं. पण घे बरं जरा याला, दुसरं एक औषध सुचलंय् मला. तें तरी डॉक्टर येईपर्यंत करतें मी. "

भरून गेलेले डोळे पुसत विमल म्हणाली, " नको हो, राहूंद्या त्याला तुमच्याच मांडीवर; मला सांगा काय आणायचं तें. त्याच्याकडे पाहिलं कीं, मला धीर निघत नाहीं. "

"अग, पण तुला साधायचं नाहीं तें औषध. थोडा वेळ घे याला. "

तों ती जास्तच रडत म्हणाली, " पायां पडतें मी तुमच्या; पण राहूंद्या त्याला तुमच्याच मांडीवर; तुम्ही आहांत म्हणून मला एवढं तरी सुचतय्. नाहीं तर हें बघून मीच बेशुद्ध होऊन गेलें असतें. माझा बाळ ! माझ्यावर एवढी दया करा, पण आजचा दिवस तरी तुमच्याजवळ राहूंद्या तो. "

" काय वेडी आहेस तू. दया करायला बाळ परका कां आहे मला ? माझ्या बाळाचा बाळ, कुलदीपक आहे माझा. आजचाच दिवस कशाला, पण माझ्या कुडींत जीव असेपर्यंत मी ह्याला माझ्यापासून दूर करणार नाहीं." छातीशीं बाळाला घट्ट धरून पार्वतीबाईनें म्हटलें.

इतक्यांत रघुवीर डॉक्टरला घेऊन आला. डॉक्टर मुलाला तपासूं लागले. विमलला अगदीं राहवेना. तिनें रडत रडतच विचारिलें,

" असं कशानं झालं हो माझ्या बाळाला ? "

" आतां थोडं ठीक दिसतंय्. झटक्याचा जोरही बराच कमी झालाय्. मुलाला दांत येताहेत वाटतं. अच्छा, घाबरायचं कांहीं कारण नाहीं. ( विमलकडे पाहत ) अन् तुम्ही अशा धीर सोडून रडताहांत काय म्हणून ? छे छे, अगदीं शांत रहा. अहो, असं भिण्याचं मुळीं कारणच नाहीं. आतां प्रकृति ठीक आहे त्याची. मी आतां औषध पाठवून देतों, तें आज तीन वेळां द्या. संध्याकाळीं मी पुनः एकदां पाहून जाईन ! " डॉक्टरचें हें बोलणें ऐकून विमल जराशीं शांत झाली. रघुवीरनें दिलेले व्हिजिटचे तीन रुपये खिशांत टाकून डॉक्टर निघून गेले आणि त्यांच्या पाठोपाठ औषध आणण्याकरितां रघुवीरही बाटली घेऊन सायकलवर स्वार झाला.

मांडीवर स्वस्थ पडलेल्या मुलाकडे पार्वतीबाई पहात होत्या. कसें कुणाला ठाऊक, पण त्यांच्या मनाचें फाटक एकदम मोकळें झालें. शाळा सुटल्याबरोबर मुलांचा घोळका जसा बाहेर पडतो, तसा अनेक विचारांचा घोळका त्यांच्या मनांत गर्दी करूं लागला. दोनच दिवसांपूर्वीं आपण सूनबाईला अडचण वाटत होतो आणि आज आपल्याशिवाय इथलं पानही हलूं नये ? आपली उपयुक्तता आजच सूनबाईच्या ध्यानांत आली काय ? कदाचित् तिच्या तारुण्यसुलभ आकांक्षांना परवाच्या बोलण्याचं कांहीं वाटलं नसेल; पण बाण मारणाऱ्या शिकाऱ्याला कां पडलेल्या जिवाच्या यातना समजणार आहेत ? किती डंखलं तें बोलणं. मन कसं होरपळून गेलं. ती वेदनांची शिरशिरी पुनः एकदां त्यांच्या मनाला कापीत गेली. त्याबरोबर दुखावलेल्या अंतःकरणांतून उफाळून आलेले कढ त्यांच्या डोळ्यांतून पाझरूं लागले.

# मी आणि ती !   :   :   ८

रविवार आणि आळस हे सख्खे भाऊ आहेत असें मीं निःशंकपणें म्हणूं शकतों. कारण रविवारच्या दिवसाइतका आळस माझे अंगांत कधींच शिरत नाही. रोज सकाळीं पांच वाजतां उठून नेमानें मंडईतली भाजी सहाच्या ठोक्याला घरीं आणून टाकणारा मी, आज आठ वाजून गेले तरी चहा पीत घरांतच रेंगाळत होतों. हातांतला कप खालीं ठेवून खुंटीवरील पिशवी सायकलला अडकवीत मी सुमतीला विचारिलें,—" हं बोल लौकर ! काय आणायचें आज तें? नाहीं तर मी आणावी एखादी भाजी नि ती पाहतांच तुझ्या कपाळावर चढावी आंठी. तसलं कांहीं मला पसंत नाहीं. हं बोल झटपट "—

नुकत्याच गाळलेल्या चहाचा कषाय गाळणींतून झटकीत किंचित् सरोष मुद्रेनें सुमति म्हणाली, " तर तर आपण आणलेली भाजी मी अगदीं फेंकूनच देतें वाटतं. आपणांला काय आवडत असेल ती आणा. अन् रोजच्यारोज तेंच काय सांगायचं ? मंडईत काय चांगली भाजी दिसेल ती आणावी. "

" विचारलं म्हणजे काय मान चढतो वाटतं ? बरं नको सांगूस. तुला न आवडणारीं कालीं नि कढवंच्या, ह्याच आणतों म्हणजे झालं. मला मंडईत तेवढीच भाजी दिसली म्हणून मग सांगेन. "

" तीं आणा, त्याबद्दल मीं कांहीं म्हणेन कां पहा ? पण तुम्हांला न आवडणारी पुरणाची पोळी करून ठेविली तर मात्र रागावूं नका—"

बोलत बोलतच तिनें गाळणी वर खुंटीवर अडकवून ठेवली, व माझ्याकडे पुनः मान फिरवून म्हणाली, "हें पहा, माझ्या मनांत एक कल्पना आली आहे. रोजच्यारोज कोणची भाजी आणायची ह्याची उगीच चर्चा करण्यापेक्षां कोणच्या दिवशी कोणची भाजी करायची ह्याचं एक आपण पत्रकच तयार करूं म्हणजे झालं–सोमवारीं–मेथी व बटाटे; मंगळवारीं–मटार, कोथिंबीर; बुधवारीं–भोपळा, आलें,–काय हंसूं कां आलं माझ्या बोलण्याचं ?—"

"छट् हंसूं कशाचं यायचं ? मोठं पद्धतशिर काम होईल हें ! रोज जेवायचं किती याचं देखील आपण पत्रक तयार करूं–सोमवारीं मुद्भर–भात नि पळीभर वरण; मंगळवारीं चतकोर भाकरी नि चमचभार चटणी.–मोठें बेश काम होईल बघ सुमति हें ! पसंत बुवा आपल्याला एकदम–"

माझी ती थट्टा पहातांच सुमति बरीचशी चिडल्यासारखी झाली– "सांडून टाकीन मी दूध हें असं बोलाल तर ! दुपारच्या चहाला दूध नाहीं मिळायचं नि मी करायचीही नाहीं पण—"

जास्त बोलून उगीच डिवचण्यात अर्थ नाहीं, असें पाहून मी सायकलवर टांग मारून बाहेर पडणार तोंच कोणीतरी मला हांक मारलीशी वाटली; म्हणून मीं मागें वळून पाहिलें, तों आमचे दोस्त सपत्निक माझ्याकडे हात हालवून मला बोलावीत आहेत असें दिसलें. सायकल वळवून मीं त्यांच्यापाशीं जातांच 'दोस्तराष्ट्रां'चा 'हल्ला' आला. पहिलीच 'तोफ' उडाली, "मन्या लेका ! बहिरा बिहिरा झालास कीं काय ? समजत नाहीं. आम्ही इतक्या हांका मारल्या. माझी नाहीं निदान हिची तरी हाक तुला ऐकूं

यायला पाहिजे होती. हिचा पल्लेदार अतएव कर्कश आवाजाचा आजपर्यंत मला केवढा पण आधार नि अभिमान होता—"

हें ऐकतांच दोस्तराष्ट्राच्या देवतेनें एकदम महिषासुरमर्दिनीचें रूप घेतलें. दुर्दैवानें असलेल्या दोनच हातानें आपला निषेध प्रकट करीत ती म्हणाली, "आपण खरोखरीच Sound Proof कानाचे म्हणूनच टिकलात माझ्या या तोफखान्यापुढं. नाहींतर एव्हांना आपल्या कानाचे कानबले झाले असते नाहीं ? मनोहरपंत, असलं वेळीं अवेळीं आलेलं थट्टेचं उधाण मला नाहीं बाई आवडत."

तो प्रेमकलहाचा सीन जास्त वेळ पाहण्यापेक्षां त्यांनीं मला कशाकरितां बोलावलें या उत्सुकतेनें मीं म्हणालों, "श्रीधरपंत आणि सत्यभामाबाई, मीं दोघांची एकमेकांच्या चुकांबद्दल एकमेकांजवळ क्षमा मागून विनंति करितों कीं, माझ्यावर आपल्या बोलावण्याचा कां हल्ला झाला ?"

"त्याचें असें झालें कीं" श्रीधर सांगूं लागला, "कालच सोलापुराहून बापू नि त्याची बायको आली आहे. त्याच्या नि ह्या बाईसाहेबांच्या ( तिरपा कटाक्ष टाकून ) मनांतून अमरज्योतीच्या पायीं कांहीं रुपयांचा चक्काचूर करून टाकण्याचा विचार आहे. तेव्हां म्हटलं माझ्याबरोबर तुलाहि आपल्या जाळ्यांत ओढून घेऊन बुडवावें. आजच्या दुपारच्या खेळाला जायचं आहे. आम्ही बरोबर दोन वाजतां सहकुटुंब व सहपरिवारें येत आहोंत. चहाची नीट व्यवस्था ठेव. पिंवळा लिप्टनचा डबा वापर बरं कां—आधीं सांगून ठेवतों. तुझं नि सुमतीचं तिकिट काढून ठेवतों आहे मी. नीट हशियार रहा."

" कोण बापू नि त्याची बायको आली आहे ? छान्. किती दिवसांत बेटा भेटला नव्हता. आतां कुठं सोलापुरला का असतो ? "

" हो तिथल्या मिलमध्यें आहे तो. तुझी त्यानं आल्याबरोबर चौकशी केली. सुमतीची ओळख व्हावी अशी त्याच्या बायकोची इच्छा आहे. "

मधेंच सत्यभामा म्हणाली, " मोठा छान आहे बाई तिचा स्वभाव. दोन दिवसांतच आमचं इतकं मेतकूट जमलं आहे कीं, कांहीं बोलायची सोय नाहीं. गप्पा मारण्याच्या नादांत आमचं कालचं रात्रीचं जेवण तर एक वाजतां आटपलं. "

" खैरच म्हणायची ही. नाहींतर कालचं जेवण उद्यां आटपलं असतं तर काय करायचं होतं ! इलाज कां होता त्याला ? " मधेंच श्रीधरनें एक चिमटा घेतला. पुनः तंटा, पुनः तो सीन, पुनः रीटेक---

मीं घाबरून मधेंच म्हणालों, " अच्छा, श्रीधर दुपारीं तयार आहे आम्हीं आपल्या स्वागताला. आतां बापू येऊं दे नि त्याची बायको येऊं दे. असा आतिथ्यानें गार करून सोडतों कीं बस्स ! जांऊं दे मंडईत मला लौकर, सामान आणून टाकून सुमतीला गडबडीनें तयारी करावयास लावतों. पुनः लॉन्ड्रींतून कपडे आणायचेत्. प्रोव्हिजन स्टोअरमधून किरणा सामान आणायचं--घासलेट तेल आणायचं आहे--किती तरी कामं पडलीं आहेत. अच्छा. "

माझा हात दाबीत श्रीधर म्हणाला, " आज दुपारचा खेळ सोडायचा नाहीं बरं. किती दिवसांनीं आपल्या दोस्ताची गांठ पडली आहे ही. सहकुटुंब पुनः अशी केव्हां वेळ येईल कोण जाणे ?

सुमति नि तूं तयार रहा बरं ! कसली देखील सबब चालणार नाहीं आज मला. ओढून नेईन तसा नाहीं आलास तर—अच्छा. "

सायकल भिंतीला लावून मंडईतून आणलेली भाजी घेऊन लगबगीनेंच मीं घरांत पाऊल टाकलें. पिशवी थोड्या जोरानें खालीं फेंकून देऊन, कपाळावर येणारी बट मनाजोगती नीट करीत बसलेल्या सुमतीला म्हणालों, "--एकदम जल्दी मंगताय् आज. सुमे, आज आपल्याकडे पाहुणे येणार आहेत दुपारी चहाला. जल्दी आटप."

" चहाला ?— कोण आहेत बाई हे पाहुणे ? " भिंवया संकोचित करून तिनें विचारलें.

" आहेत असेच दोन पायांचे, बापू आहे त्यांचं नांव नि शकू आहे त्यांच्या सहचारिणीचं नांव. सोलापूरला असतात ते. ५१ रुपये पगार आहे त्यांना, दहा रुपयाचं भाड्याचं घर आहे त्यांचं-"

" पाया पडूं कां आपल्या ? सरळ बोलायचं नाहीं असा कां आपला अधिकांतला नेम केला आहे ?"

" ओ ! डोन्ट बी सो सीरिअस्. सरळ सागतों मग तर झालं ? आज दुपारीं तो श्रीधरसह आपल्याकडे येणार आहे. आमचे ते लंगोटी—नो पायजमा दोस्त. दोघांनीं एका दिवशीं एकमेकांची कॉपी केली म्हणून दणकून मार खाल्ला; म्हणून एकमेकांना एकमेकांची सहानुभूति उत्पन्न झाली व त्याचं रूपांतर शेवटीं दृढ मैत्रींत झालं. दुपारच्या चहाच्या वेळेला मटारची उसळ नि रव्याचे लाडू कर—"

" दुपारीं किती वाजतां येणार आहेत ते ? हो आपल्याला सांगायला विसरलेंच मीं, माझीही बाळमैत्रिण आली होती मघाशीं.

कालच ती मुंबईहून आली. दुपारीं ‘ अछूत कन्या ’ पहायला येण्यासाठीं तिनं मला गळ घालून तिकिट काढून ठेवलं आहे. म्हणून म्हणत्यें कीं, दोनच्या अगोदर तुमचे मित्र आले असते तर बरं झालं असतं. ”

“ ओहो ! तुला देखील मी हेंच सांगणार होतों. आम्ही तिघां दोस्तांनीं आज दुपारीं ‘ अमरज्योती ’ ला जाण्याचा बेतच केला आहे मुळीं. तुला आलं पाहिजे आज सिनेमाला माझ्याबरोबर.

“ मी कशीं तुमच्याबरोबर येऊं शकणार ! माझ्या मैत्रिणीनं तर माझं तिकिट काढून अगदीं गळ्याची शपथ घालून गेली आहे. तिचा कसा मी विरस करूं. तुम्ही एकटे जा हवे तर सिनेमाला ?”

“ बा: श्रीधरनं तर एव्हांना सहा तिकिटं काढलीं देखील असतलि. त्यानं मला अगदीं बजावून सांगितलं आहे कीं, सगळ्यांनीं मिळून मजेनं जायचं म्हणून. अन् तूं आतां म्हणतेस कीं, माझ्याबरोबर येत नाहीं म्हणून. श्रीधर काय म्हणेल मला ? निदान बापूच्या बायकोला तरी काय वाटेल ? ” ती माझ्याबरोबर न येतां तिच्या बालमैत्रिणीबरोबर जाणार व आमचा सर्वांचा विरस करणारा हें पाहतांच मला थोडासा राग आला.

“ तुम्ही म्हणतां हें मला देखील पटतें पण तुम्ही माझी ‘पोझिशन’ कां पहात नाहीं ? तुमच्या बापूप्रमाणें माझी कमल देखील किती दिवसांनीं माझ्याकडे आली आहे. तिला येतें म्हणून सांगून, गेलें नाहीं तर तिला देखील वाईट नाहीं कां वाटायचें ? ती तरी काय म्हणेल ? ”

“तें कांहीं मला माहीत नाहीं. मीं सांगतों तुला आज दुपारीं

आमच्याबरोबर आलंच पाहिजे. तुझ्या मैत्रिणीला कांहीं तरी सबब सांगून परत लाव म्हणजे झालं." मी तोड काढली हें ऐकतांच ती किंचित् रोषानें म्हणाली, "तुम्हीच कांहीं तरी सांगून तुमच्या मित्राला परत पाठविलें तर बरें होणार नाहीं कां? माझ्या मनाचा विरस झाला तर चालेल पण तुमचा विरस होऊं नये असें तुम्हांस वाटतं, नाहीं? माफ करा—मीहि मनुष्यच आहें. बोलतांना एखादा शब्द जर गेला तर क्षमा करा; परंतु तसं होणं अगदीं अशक्य आहे, असं मला वाटतं." खालचा ओंठ वरच्या दांतानें दाबून ती निश्चयानें म्हणाली.

"माझ्या बोलण्याची कांहींच का किंमत नाहीं?"—मी.

"मीहि तसंच म्हणाल्यें तर?"—ती.

"श्रीधर, बापू काय म्हणतील मला?"

"माझी कमळा तरी मला काय म्हणेल?"

"बस् बस् आजपर्यंत मीं तुला अगदीं फुलाप्रमाणें वागविलें त्याचा मोबदला हेच शब्द वाटतं?"

"आणि मी तरी आपल्याशीं आजपर्यंत एकाद्या वाघिणीप्रमाणें वागल्यें आहे कां? तुम्हांला जसें आपल्या मित्रमंडळीचें मन मोडूं नये असं वाटतं तसं मला माझ्या मैत्रिणीचं मोडूं नये असं वाटलं तर तें पाप का होईल? मी फक्त माझ्याबद्दलच तिला सांगितलें, तुम्ही तर मला न विचारतांच माझ्याबद्दल त्यांना सांगितलें."

तिच्या ह्या बोलण्याचा मला इतका संताप आला कीं, कांहीं बोलण्याची सोय नाहीं. असं वाटलं कीं एकदम—

शेवटीं किती झालें तरी आम्ही बोलूनचालून पतिपत्नि. अशी

'हेर हिटलरी' तरी किती वेळ चालणार ? दोघांनीं एक कप चहा घेऊन एक तोड काढली.

दोनच्या सुमारास बापू, शकू, श्रीधर, सत्यभामा व तिची बाळमैत्रीण कमळा हीं सर्व मोठ्या थाटामाटानें व गरम नरम चहा लाडू मिळणार या कल्पनेनें डुलत डुलत माझ्या घरापुढें येऊन पाहातात तों काय ? दाराला कुलूप लागलेलें व दाराला अडकावलेली एक चिठ्ठी. तें पाहाताच तीं सर्व आश्चर्यानें थक्क होऊन गेलीं. विस्मयानें धांवत येऊन ते चिठ्ठी वाचूं लागले:—

" श्री. श्रीधर, बापू व कमळाताई यांसी:--

मघाशीं ती. काकांची तार आल्यामुळें आम्हांस तिकडे जाणें भाग पडलें. आपला विरस झाला पण त्याला नाइलाज आहे. आमच्या अपरिहार्य संकटाकडे सहानुभूतीनें पाहून क्षमा कराल अशी आशा आहे. क. लो. अ. ही विनंति.

आपले,

मनोहर प्रभाकर देशपांडे

सौ. सुमति देशपांडे

कुलूप लागलेल्या खोलीच्या आंत बसून दाराच्या फटींतून आम्हीं हें सर्व पहात व ऐकत होतों व मधूनच एकादा चहाचा घुटका घेऊन हंसत होतों.